## प्रास्ताविक

## बंगाली कादंबरीतील युगांतर आणि शीर्षेन्दु मुखोपाध्याय

प्यारीचंद मित्रांची 'आलालेर घरेर दुलाल' (1858) बंगाली साहित्यातील पहिली कादंबरी समजण्यात येत असली तरी बंकिमचंद्रच बंगाली साहित्यातील पहिले महत्त्वाचे कादंबरीकार म्हटले पाहिजेत. 1857 च्या क्रांतियुद्धानंतर कित्येक वर्षे ते आपले कादंबरीलेखन करीत राहिले. मध्यंतरी महाराणीच्या जाहीरनाम्या-नंतर तिचे साम्राज्य प्रस्थापित झाले होते. दुसरीकडे नवोदित मध्यमवर्गदेखील सुप्रतिष्ठित झाला होता. बंगालच्या व्हिक्टोरियन साहित्यिकांमध्ये बंकिमचंद्रांचे व्यक्तित्व असामान्य होते. त्या युगाच्या या आधुनिक व्यक्तित्वाला मुख्य रूपाने आपल्याच वर्गाच्या लोकांच्या मनांमध्ये चिरस्थायी स्थान मिळवायची इच्छा होती. ते ज्या मूल्यांना उचलू पाहात होते त्यांविषयी त्यांच्या मनात कसलाच संदेह नव्हता. दैव न बदलता येण्याजोगी गोष्ट असली तरी त्यामुळे वैयक्तिक स्वातंत्र्य धोक्यात येतेच असे नाही याची जाणीव होणारे बंकिमचंद्र पहिले भारतीय कादंबरीकार होत असे म्हणता येईल. 'चंद्रशेखर' कादंबरीतील (1875) प्रताप किंवा 'राजसिंह' कादंबरीतील मुबारकला या दृष्टीने पाहता येईल. दैव आणि व्यक्तीच्या संघर्षाला स्पष्ट करण्यासाठी त्यांना इतिहासाची कास धरावी लागली हे खरे. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांतून तद्वत ऐतिहासिक प्रणयप्रधान कादंबऱ्यांतूनही दैव आणि व्यक्ती यांचा हा संबंध व संघर्ष उघडपणे व्यक्त झाला आहे.

त्यांच्या 'कपालकुंडला' आणि 'कुंदनंदिनी' या कादंबऱ्या अनुक्रमे प्राचीन आणि समकालीन पात्रांवर आधारित आहेत. दोहोंत नियतीची अगोदरच सूचना असली तरी त्या अनिवार्य भवितव्यासमोर अखेरच्या क्षणापर्यंत व्यक्तीचा स्वधर्म कणमात्र क्षुण्ण होत नाही. निदान एकदोन प्रसंगी तरी बंकिमचंद्रांनी तत्कालीन व्यक्तीच्या जीवनातील गुंतागुंतीच्या मूळ कारणास मूर्त रूप दिले आहे. 'विषवृक्ष'-चा देवेंद्रनाथ काही प्रमाणावर आणि 'रजनी' (1877) चा अमरनाथ विशेष रूपाने जीवनातील गुंतागुंतीच्या निरर्थकतेशी भिडले होते. यावर असे म्हणता येईल

की ब्रिटिश वसाहतवादाची गरज भागवण्यासाठी निर्माण झालेल्या मध्यमवर्गाच्या नसांतून वाहणाऱ्या वैफल्याचा हा आविष्कार आहे. कित्येक वर्षांपूर्वी अमरनाथने म्हटलेले स्वगत, "मला हवी असलेली वस्तू मिळत नाही, हेच माझ्या दुःखाचे कारण आहे," आजही खोटे ठरलेले नाही.

– 2 –

पण व्यक्तित्वाच्या विकासातील कष्टांना सर्वप्रथम जाणण्याचे श्रेय रवींद्रनाथांना आहे. बंगीय व्हिक्टोरियनांच्या मनातील स्थायित्वाची भावना कशी पोकळ आहे हे त्यांनीच पहिल्यांदा ओळखले. त्यांनीच सर्वांत अगोदर आपल्या 'आत्मशक्ती' निबंधमालेत (1905) सांगितले की आम्ही इंग्रजांच्या कायद्याच्या बंधनांनी आमच्या समाजाला जखडून ठेवू इच्छितो ते चूक आहे. त्यामुळे एकीकडे भारतीय समाजाचा दुबळेपणा दिसून येतो तर दुसरीकडे एक फार मोठी विसंगती नजरेस पडते. ती विसंगती ही की समाजाच्या एका फार मोठ्या विभागाशी मध्यमवर्गाचे तारतम्य नाही.

व्यक्तीचे संकट आणि त्या संकटापासून सुटण्याकरिता होणारा संग्राम हा रवींद्रनाथांच्या नावाजलेल्या कादंबऱ्यांचा मुख्य विषय आहे. खरे म्हणजे त्यांच्या कादंबऱ्या मध्यमवर्गाच्या अस्तित्वाच्या उभ्याआडव्या धाग्यांचे कलात्मक रूप होय. बंकिमचंद्रांनी भवितव्याला ओळखले होते. म्हणून त्यांच्या कादंबऱ्यांत नाट्यमयता आहे. त्यांच्या कादंबऱ्यांच्या परिच्छेदांमध्ये बहुधा नाटकीय दृश्याच्या पद्धतीचा वापर आढळतो. रवीन्द्रनाथांच्या कादंबऱ्यांनी मानवी मनातील आंतरिक संघर्षाचा शोध घेतला. बंकिमचंद्रांनी आपल्या कादंबऱ्यांतून रंगविलेली पात्रे प्रतिकूल परिस्थितीशी झगडताना आकर्षक भासतात तर रवींद्रनाथांच्या पात्रांच्या व्यक्तिमत्त्वाने त्या पात्रांची परिस्थितिजन्य पार्श्वभूमीच उजळून निघते. म्हणूनच रवींद्रनाथांना आपल्या कादंबऱ्यांना कधी नाट्यमय वळण द्यावेच लागले नाही. बंकिमचंद्रांनी क्लोज्ड नॉव्हेल म्हणजे कादंबरीबरोबरच पात्राचे व्यक्तिमत्त्व पूर्ण होणाऱ्या कादंबऱ्या लिहिल्या. तर रवींद्रनाथांनी ओपन नॉव्हेल म्हणजे कादंबरी संपली तरी पात्राचे चरित्रचित्रण पुरे न होणाऱ्या मुक्त कादंबऱ्या लिहिल्या. यामुळेच त्यांची सर्व पात्रे एका साच्याची वा आकृतिबंधाची वाटत नाहीत.

'चोखेरबाली' (1903) चा महेन्द्र आणि 'जोगाजोग' (1924) मधील मधुसूदन

ही पात्रे या दृष्टीने पाहण्यासारखी आहेत. दोन्ही पात्रे एकाच मध्यमवर्गातली असली तरी त्या पात्रांचे परस्पर तोंडवळे निश्चितच भिन्न आहेत. एक मध्यमवर्गीय आईच्या मांडीवर मोठा झालेला लाडका मुलगा आहे, मानसिक दृष्ट्या छानछोकीची आवड असलेला बूर्ज्वा आणि दुसरा आहे ब्रिटिशांच्या छत्रछायेत वाढलेला धनको. 'गोरा' ( 1910 ) आणि 'चतुरंग' ( 1916 ) मधील मनोविश्लेषणात्मक चरित्रचित्रण किती वेगवेगळ्या प्रकारे दाखवले आहे पाहा. परिणामी निवेदनशैलीतही विभिन्नता आली आहे. महाकाव्याच्या धर्तीच्या 'गोरा' कादंबरीच्या गद्य शैलीत एक अनासक्त, स्थिर, सर्वदर्शी गांभीर्य आहे तर 'चतुरंग'-च्या बांधणीत कवित्वाचा गूढ स्पर्श आहे. पण काव्याचा वापर करून त्यांनी कधीही कादंबरीतील उणीव भरून काढण्याचा प्रयत्न केलेला नाही. केवळ 'नौका डूबी' (1906) या एकाच अपरिणामकारक कथावस्तूचा अपवाद वगळल्यास असे आढळून येईल की 'घरे बाइरे' (1916), 'चार अध्याय' (1934) आणि 'शेषेर कविता' (1929) या कादंबऱ्यांतून त्यांनी मानवी मनातील संघर्षाचे यथातथ्य चित्रण केले आहे. या दृष्टीने ते आधुनिक बंगाली कादंबरीकार आहेत.

रवीन्द्रनाथांनी रंगविलेल्या स्त्रीपात्रांसंबंधी काहीच नामनिर्देश केला नाही तर त्यांच्या कलेची कहाणी अपुरीच राहते. त्यांच्या सर्व मानसकन्यांनी आपल्या मुक्त छंदांतून व्यक्तिजीवनाच्या सार्थकतेचा शोध घ्यायचा प्रयत्न केला आहे. ते कवी आहेत, म्हणून असे म्हणता येईल की विनोदिनी (चोखेरबाली), दामिनी (चतुरंग) किंवा कुमुद (जोगाजोग) या जणू मुक्त छंदाच्या कविताच आहेत. वसाहतवादामुळे निर्माण झालेल्या या मध्यमवर्गीय समाजजीवनात सरंजामशाहीचा उरलासुरला सांगाडा नेहमी त्यांना कुंठित करीत राहिला आहे आणि आपल्या शुद्धपणाच्या अग्नीने त्या स्त्रिया वारंवार त्यास दग्ध करीत राहिल्या आहेत. या बाबतीत दामिनीचे चरित्र उल्लेखनीय आहे. तिला कधीही ओड् टू दि नॉर्थ विंड् म्हणायची पाळी आली नाही.

## – 3 –

रवीन्द्रनाथांच्या 'विनोदिनी'ने प्रभावित होऊन आपले अत्यंत लोकप्रिय कादंबरीकार शरच्चंद्र ह्यांनी आपल्या विख्यात स्त्रीपात्रांचे चरित्रचित्रण केले. शरच्चंद्रांमध्ये कल्पनाशक्तीची थोडी कमतरता असल्याने त्यांच्या कादंबऱ्या कथा-

वस्तूच्या दृष्टीने शिथिल असल्या, त्यांच्यापाशी सांगण्यासारखे फार थोडे असले तरी स्त्रीप्रेमाच्या स्वातंत्र्याचा ध्वज ते उंच धरीत राहिले. 'भारती' युगाच्या रोमँटिक कादंबऱ्यांपासून त्यांनी बंगाली कादंबरीस मुक्त केले. काही वेळा मर्यादा पडत असतानाही विषयासंबंधीच्या अचूक समजुतीमुळे शरच्चंद्रांना कादंबरीलेखनात यश लाभले. त्यांची पुरुषपात्रे बौद्धिकतेच्या दृष्टीने उच्च असूनही जिवंत आहेत. स्त्रीपात्रांचे आचरण कित्येकदा निरर्थक वाटते. पण मनातील आवेगापुढे त्यांचा निरुपाय होतो. 'श्रीकांत' (1917) भाग १ आणि 'गृहदाह' (1920) या दृष्टीने पाहण्यासारख्या आहेत.

बंकिम-रवीन्द्र-शरत् यांचा कालखंड बंगाली कादंबरीचा पहिला कालखंड होय. दुसरा कालखंड 1930 ते 1950. या कालखंडामध्ये बंगाली साहित्याची प्रगती कुणा एका कादंबरीकारामुळे झाली, असे म्हणता येणार नाही. किमान सहा कादंबरीकार या युगात आपापल्या पद्धतीने जीवनाचे चित्रण करीत होते. त्यांतील अत्यंत महत्त्वाचे असे तीन कादंबरीकार म्हणजे ताराशंकर बंदोपाध्याय, माणिक बंदोपाध्याय आणि विभूतिभूषण बंदोपाध्याय. कलात्मक शैली आणि कथा या दृष्टीने बनफूल आणि बुद्धदेव बसू यांच्या कादंबऱ्या संस्मरणीय आहेत. इतर कादंबऱ्या वगळता केवळ बंदोपाध्याय त्रिकूटाने लिहिलेल्या किमान सहा कादंबऱ्या तरी जागतिक वाङमयामध्ये मानाचे स्थान मिळवू शकतील अशा आहेत. त्यांत 'हाँसुली बाकेर उपकथा' (1947) आणि 'कवी' (1942) या ताराशंकरांच्या, 'पाथेर पांचाली' (1929) आणि 'आरण्यक' (1939) या विभूतिभूषण यांच्या आणि 'पुतुल नाचेर इतिकथा' (1936) आणि 'पद्मानदीर माँझी' (1938) या माणिक बंदोपाध्याय यांच्या कादंबऱ्यांचा समावेश होतो. विशाल अनुभूती आणि राष्ट्रीय भावना या दृष्टीने ताराशंकरांच्या कादंबऱ्या अतुलनीय आहेत. विभूतिभूषण यांचे अनुभूतिक्षेत्र तितके विस्तृत नसले तरी मर्मस्पर्शी लेखनात त्यांचा हातखंडा आहे. माणिक बंदोपाध्याय यांनी दैवाची गुंतागुंत आत्मसात केली होती. जीवनाच्या गुंतागुंतीचेच ते दुसरे नाव होय. या बाबतीत त्यांनी त्यांच्या पूर्वीचे श्री. जगदीश गुप्त यांनाही मागे टाकले.

बंगाली कादंबरीस दुसऱ्या कालखंडातून तिसऱ्या कालखंडात नेल्याने माणिक बंदोपाध्याय यांना एक विशिष्ट स्थान असून याच कारणास्तव त्यांना साहित्यक्षेत्रात विशेष मान आहे.

सतीनाथ भादुडी हे पाचव्या आणि सहाव्या दशकाचे कादंबरीकार आहेत. त्यांनी विविध विषयज्ञानात आपल्या असामान्य कर्तृत्वाची ओळख दिली. 'अचिन

रागिणी ' ही काव्यात्मक प्रकृतीची असली तरी साहित्यिक मूल्यांच्या दृष्टीने 'जागरी ' पेक्षा कमी नाही. त्यांच्या 'ढोंढाई चरित मानस ' चा पहिला भाग तर अत्यंत उत्कृष्ट वठला आहे.

– 4 –

शीर्षेन्दू मुखोपाध्याय आणि त्यांच्या समकालीनांनी कादंबरीलेखन सुरू केले त्याच्या आधीच्या दशकामध्ये बंगाली कादंबरीत एक नवे वळण दिसू लागले होते. ते काही फारसे उत्साहवर्धक नव्हते. दुसऱ्या महायुद्धानंतर हे वळण दृढमूल होऊ लागले होते. थोडक्यात सांगायचे तर त्यावर इतिहास आणि भूगोलाची छाप होती. दुसऱ्या महायुद्धानंतर मध्यमवर्गीय जीवनाची जुनी मूल्ये उध्वस्त झाली, आवडी-निवडी पालटल्या, फाळणीमुळे जुनी ग्रामीण स्वप्ने भंग पावली, व्यक्तीच्या आशा भग्न झाल्या, भविष्य शून्यवत झाले—या सर्व वस्तुस्थितीशी सामना न करता कादंबरीकारांनी कथावस्तू बदलण्याचा धोपट मार्ग स्वीकारला होता. म्हणूनच या कालखंडात इतिहासाशी फारशा प्रामाणिक नसलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्या आणि अनोळखी लेबलांनी झाकलेल्या कथा मिळतात. तात्पर्य, संपूर्ण संघर्ष डोळ्यांसमोर उभा राहात नाही.

या अवधीत कित्येक कादंबरीकारांनी बंगालच्या मध्यमवर्गीयांच्या समस्यांचे आपल्या कादंबऱ्यांतून चित्रण केले. या दृष्टीने ज्योतिरिन्द्र नन्दी यांची 'बार घर एक उद्यान ' आणि संतोषकुमार घोष यांची 'किनु गोयालार गली ' या कादंबऱ्या उल्लेखनीय आहेत. दुसरीकडे व्यक्तीच्या जीवनसंघर्षाचे चित्रण करण्याच्या दृष्टीने असीम रायची 'गोपालदेव ' उल्लेखनीय आहे. अमियभूषण मजुमदार आणि गुणमय माना यांच्या महाकाव्याच्या धर्तीच्या दोन कादंबऱ्याही आम्हांला या ठिकाणी लक्षात घ्यायला हव्यात.

मोती नन्दी, शीर्षेन्दू मुखोपाध्याय, देवेश राय, श्यामल गंगोपाध्याय, बरेन गंगोपाध्याय इत्यादी कथाकारांनी सहाव्या दशकाच्या सुरुवातीपासूनच आपल्या कथांच्या माध्यमांतून हे स्पष्ट करून टाकले की वस्तुस्थिती स्वतःच पालटली आहे. देवेश राय अजून पुरते कादंबरीकार झाले नाहीत. पण बाकीच्या लोकांनी सहाव्या दशकाच्या मध्याच्या सुमारास कादंबरी हेच आपल्या लेखनाचे माध्यम म्हणून स्वीकारले होते. ताराशंकरांच्या 'योगभ्रष्ट ' सारख्या कादंबऱ्यांतून मानवी

समस्यांचे चित्रण आढळत असले तरी हेही तितकेच खरे की तरुण तथा तरुणेतर लेखकांच्या कलाकृतींमधून द्वितीय महायुद्धोत्तर युगाचे रेखांकन पहिल्यांदा मोठ्या प्रमाणावर झाले. याच लेखकाच्या हाती बंगाली कादंबरी कलकत्त्याच्या वातावरणात परतली. हे सारे घडल्याचे नुसते सांगून भागणार नाही. तर असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल की माणिक बंदोपाध्याय यांच्या फक्त उत्तराधिकाऱ्याच्या रूपात नव्हे तर उत्तरसाधकांच्या रूपात या लेखकांनी कादंबरीला पुन्हा व्यक्तीच्या विश्वात नेले. सुनील गंगोपाध्याय यांच्या प्रसिद्ध 'आत्मप्रकाश' (1966) कादंबरीत माणसाच्या सचेतन जगातील क्लेशांना प्राधान्य देण्यात आलेले आहे. मध्यंतरीच्या काळात पाचव्या दशकाचे तरुण कादंबरीकार समरेश बसू यांनी 'विवर' (1965) ही अत्यंत प्रक्षोभक आणि विवादास्पद कादंबरी लिहिली आणि बंगाली कादंबरीचा तिसरा कालखंड सुरू झाला. 'विवर'चा नायक घ्या किंवा लोकनाथ भट्टाचार्य-सारख्या कवीने लिहिलेल्या 'बाबूघाटेर कुआँरी माछ' या प्रतीकात्मक कादंबरीचा नायक घ्या, त्यांच्यावरून आपणांस दिसून येते की नायकोचित गुण असलेल्या नायकांच्या युगाचा अंत झाला आहे. दृश्य आणि द्रष्टा यांच्या संयोगाने एका तिसऱ्याच जगाची निर्मिती झाली आहे, ज्याचे वास्तविक अस्तित्व व्यक्तीच्या चेतन-अवचेतन मनातील गुंतागुंतीच्या आलोक-अंधकारात आहे.

शीर्षेन्दूने आपल्या आत्मचरित्रात्मक 'उजान' (1972) कादंबरीत एक अर्थपूर्ण उक्ती दिली आहे–'जगात एकदा एका रीतीने जन्म झालाच आहे तर आता दुसरे कोणतेही रूप मिळणे शक्य नाही.' बाकी काही नाही, याच नावगाव नसलेल्या माणसाच्या शोधात कादंबरीकार असतात. शीर्षेन्दूदेखील हाच शोध घेणाऱ्या कादंबरीकारांपैकी आहेत. याच 'उजान' कादंबरीचा नायक कुकू पहिल्यांदा शाळेत गेला तेव्हा मधुसूदन या खऱ्या नावाने हाक मारल्यावर लगेच 'ओ' देऊ शकला नाही. बरोबर नावाने हाक मारायला हवी नाहीतर उत्तर मिळायचे नाही. विभिन्न नावांनी ओळखली जाणारी व्यक्ती कोणत्या नावावर उत्तर देईल ही शीर्षेन्दूंची जिज्ञासा आहे. त्यांच्या 'फेरा' कादंबरीचा नायक अतनू साऱ्या नामांची आवरणे फेकून अखेरपर्यंत आपल्या स्वत्वाच्या अविच्छिन्न अस्तित्वाचा आविष्कार करू शकला का ? व्यक्तीचे अशा प्रकारे स्वतःस हरवून टाकणे आणि पुन्हा त्यास प्राप्त करणे हाच शीर्षेन्दूंच्या कादंबऱ्यांचा विषय आहे.

शीर्षेन्दूंच्या अत्यंत प्रातिनिधिक स्वरूपाच्या दोन कादंबऱ्या म्हणजे 'घुनपोका' (1967) आणि 'पारापार' (1971) या होत. 'घुनपोका' ही शीर्षेन्दूंची

पहिलीच कादंबरी. दोन्ही कादंबऱ्यांत व्यक्तीचे एकाकीपण आहे. व्यक्तीवरील असाधारण क्रमवृद्धिशील ओझे हा यांचा मुख्य विषय आहे. धूसर वा मळकट रंगाचा उपयोग शीर्षेन्दू विशिष्ट गूढ अर्थाने करतात. त्यांच्या पात्रविषयक कल्पनेत एक प्रकारचे औदासीन्य तरळत असते. 'घुनपोका'चा श्याम आणि 'पारापार'चा ललित हे कादंबरीतील पात्रांचा मुखवटा तसाच ठेवूनही संस्कृतीच्या दृश्य पटावर आधुनिक मानवाचे प्रतिनिधित्व करतात. या मानवात विश्वभ्रमंतीची जिद्द नाही, ती जिद्द हरपल्याचे त्यास दुःख नाही, ती जिद्द पुन्हा आणण्यासाठी तो हात पुढे करीत नाही. ज्या युगात माणसाच्या दृष्टीने इतिहास-समाज-राजनीती हे सर्व अर्थशून्य झाले आहे त्या युगातील असहाय्य व्यक्तीची पुन्हा स्वतःप्रति जागरूक होण्याची कथा जे अंतर्द्रष्टे कादंबरीकार लिहितात त्यांच्यांत शीर्षेन्दू आघाडीवर आहेत. म्हणून बघता बघता त्या मळकट रंगाभोवती केशरी रंगाचा काठ स्पष्ट होत जातो. त्यांच्या कादंबऱ्यांतून आणि कथांमधून वेडी व अर्धवट माणसे बहुधा भेटतात. पण करुणरसाच्या निर्मितीसाठी त्यांनी ही वेडी पात्रे निर्माण केलेली नाहीत. त्यांच्या 'उतरेर बालकनी' या नितांतसुंदर लघुकथेतील वेडा जणू शीर्षेन्दूंच्या सर्व वेड्यांचा प्रतिनिधी म्हणता येईल. तथाकथित कीर्ती आणि निरर्थकता, मिळवणे आणि हरवणे या सर्वांना जेव्हा अर्थ उरत नाही तेव्हा परिस्थितीचा माणसावर परिणाम होत नाही. श्याम व विमानमध्ये याच गोष्टीचा आविष्कार दिसून येतो. 'उतरेर बालकनी'च्या अरुणमध्ये अशा प्रकारच्या चरित्राची व कल्पनेची पराकाष्ठा आहे. तो पहाडासारखा मूक आहे त्याच्यासमोर आहे आमच्या परिचित वास्तवतेची खळाळून वाहणारी नदी. ती नदी आज वाहतेय पण कधी काळी आटून जाण्याचीही शक्यता आहे. अंतर्गत वस्तुस्थितीला अशा प्रकारे अनुभवगम्य करून देण्यातच आधुनिक कादंबरीचे यश आहे. या कलाकारांचे ध्येय बाह्य वस्तुस्थिती नसून आंतरिक वस्तुस्थिती आहे.

'घुनपोका'चा श्याम अनन्वित आधुनिक माणसाचे प्रतिनिधित्व करतो. तो प्राप्त परिस्थितीने खचलेला आहे. सर्व बाह्य परिस्थिती त्याच्या विरुद्ध बंड पुकारते. सत्य हे त्याच्या लेखी चेतनेमध्ये प्रतिबिंबित झालेले वास्तविक चित्र आहे. अलिप्तता हीच त्याची अनुभूती आहे म्हणूनच तो विशिष्ट वर्गाचा प्रतिनिधी नाही. तो कुणाचाच प्रतिनिधी नाही, तो स्वयंपूर्ण आहे. एकाकी आहे. स्वतःच्या इच्छेनुसार त्याने नोकरी सोडली आहे. तेव्हापासून त्याचे नात्यागोत्याचे संबंध तुटत चालले आहेत. 'इतू' बरोबरच्या आपल्या स्नेहसंबंधाचीही त्याला पर्वा नाही. खरी गोष्ट ही आहे की

तो हळूहळू त्या सूत्रांना आपल्यातच गुंडाळीत आहे. मोटर सायक्लिस्ट आणि नीना यांचे विपरीत अर्थाने जणू त्याच्या स्वतःच्या जगाबाहेर अस्तित्व आहे. आधिभौतिक जगात त्याला हृदयशून्य वैर मिळते. म्हणून श्यामच्या जगातील वास्तवतेचे प्रतिहत रूप, त्या जगाच्या आपल्या आगळ्या 'लॉजिक'ने विकसित होते.

संपूर्ण कथानक श्यामभोवती गुंफण्यात आले आहे. श्यामची ही कथा टक्के-टोणपे खाऊन कुठल्या कुठे जाऊन पोचते. कादंबरीतील अखेरच्या घटनेनंतर कदाचित श्याम वेडसरपणातून बाहेर निघेल. कादंबरीतील श्यामच्या कथेत मनो-विश्लेषणास योग्य अशी सारी कारणे थोडयाफार प्रमाणावर आहेत. मोटर-सायकलच्या घटनेत काल्पनिक भीती आहे आणि इतूबरोबरचा लपंडावदेखील अनैसर्गिक आहे. इतूबरोबरच्या या खेळामार्फत श्यामला अजाणता काय सांगायचे आहे ? त्याने म्हटले आहे की वास्तविकता, ईप्सित वास्तविकता त्याला आता मुळीच स्पर्श करू शकत नाही. श्याम स्वतःच त्यापासून दूर राहील. हे सारे स्वाभाविक आहे. कारण, श्याम सान्या अनैसर्गिक गोष्टी नैसर्गिक झालेल्या कालामधील आहे. या युगात समाधान आणि नैसर्गिकता याच गोष्टी फक्त अनैसर्गिक आहेत. 'पारापार' च्या विमानला जेव्हा या गोष्टीचे आकलन झाले की आकाश काही त्याच्या मस्तकात प्रविष्ट होणार नाही त्याच दिवशी तो 'स्मग' म्हणजे भौतिक अर्थाने संतुष्ट, 'ॲव्हरेज' वा सामान्य झाला.

श्यामचा दोषारोपणाचा समजसुद्धा आधुनिक कालखंडातील माणसासारखाच आहे. आपणच जबाबदार आहोत. आपलाच अपराध आहे—हा संदेह, हा अनिवार्य न्यूनगंडदेखील समाजानेच निर्माण केलेला आहे. तरी श्यामची कथा वैफल्याची कथा नाही. सर्व व्यथा सहन करूनही माणूस आपले पुढील आयुष्य यशस्वी करील ही भावना श्याम किंवा ललितच्याच व्यक्तिचित्रणात नव्हे तर 'सूनेर उद्यान' मधील गौरहरीच्या चित्रणातही आढळते. या नवजन्मासाठी जननीच्या उदरात परत-ण्याची आकांक्षा ही खरे सांगायचे तर नवजन्मासाठी मृत्यू पत्करण्याची आकांक्षा आहे. याच कारणावरून 'पारापार'च्या ललितने व्याधिमंदिर मानवजातीसाठी ही आकांक्षा व्यक्त केली आहे. 'घुनपोका'च्या श्यामनेदेखील हीच आशा व्यक्त केली आहे. शीर्षेन्दूंनी निर्माण केलेल्या पात्रांना गौरहरीप्रमाणे जिथे प्रेम, परिपूर्णता आणि ईश्वर आहे त्या अमर यात्रेचा प्रवास करावयाचा आहे. होय. शीर्षेन्दूंनी उघडपणे 'ईश्वर' शब्द वापरला आहे आणि या वेळी शीर्षेन्दूंचे वय सदतीस वर्षे दोन महिने आहे.

**—सरोज बंदोपाध्याय**

जून महिना. श्यामने नोकरी सोडली. कारण फारसे मोठे घडले नव्हते. 'सेन्ट अ‍ॅण्ड मिलर' ह्या फर्ममध्ये तो ड्राफ्टस्‌मन होता. त्याच्या बॉसने, हरी मुजुमदारने, एक दिवस सर्वांच्या समोर त्याला शिवी दिली. "बॅस्टर्ड."

खरे तर, इतके दिवस श्याम हरी मुजुमदारच्या बोलण्याची, हावभावांची थट्टा करायचा. नवीन लागलेल्या ड्राफ्टस्‌मनमध्ये तो हरी मुजुमदारच्या बोलण्याची आणि त्याच्या शिव्यांची नक्कल करायचा. इतक्या वेळा नक्कल झाली होती की त्या शिव्यांमधला सगळा दम निघून गेला होता. नवीन शिव्या आढळत नव्हत्या.

तरीही दोनेक दिवस श्याम अस्वस्थ झाला. विमनस्क मनस्थितीत टायची गाठ उगीच इकडून तिकडे सरकवी. बाथरूममध्ये आरशासमोर शून्य दृष्टीने स्वतःचेच रूप न्याहाळत राही. संध्याकाळी मित्रमंडळींच्या अड्ड्यावर जायचे त्याने सोडून दिले होते. घरीच झोपून राही. अस्वस्थता, तळमळ त्याला सोडीत नव्हती. तसे पाहिले तर, त्याला मिळालेल्या शिव्या काहीच नव्हत्या. मुद्दाम, अर्थ समजून मुजुमदारने त्याला शिव्या दिल्या नव्हत्या हे श्यामला समजत होते, त्याला राग अनावर झाला होता आणि केवळ ह्या शिवीवाटे त्याने तो प्रगट केला होता हेही श्यामला समजत होते. शिवाय आजपर्यंत, श्यामने कितीतरी वेळा तसल्या शिव्या लोकांना दिल्या होत्या. त्याच शिव्या स्वतःला मिळाल्या तेव्हा वाईट का वाटावे ? नोकरीही अशीतशी नव्हती. सोन्याचे अंडे देणारी कोंबडी होती.

मध्यंतरी तो बाजारातून हिंडायचा तेव्हा फ्रीज, रेडिओग्राम, जुनी छोटी मोटर, सर्वांच्या किमती त्याने विचारून ठेवल्या होत्या. बड्या लोकांच्या अगदी विरळ वस्तीतील दोनतीन इमारतींतले देखणे फ्लॅटही त्याने पाहून ठेवले होते. श्यामला

फार असहाय वाटले. नोकरी सोडायचा विचारही त्याने कधी केला नव्हता. उलट इतके दिवस ह्या नोकरीने त्याच्या मनात उंच आशाच निर्माण केल्या होत्या.

हळूहळू श्यामची निराशा वाढत चालली, शीळ घालीत रस्त्यातून हिंडणे, रविवारी शाम्पूने केस धुणे, सुट्टीच्या दुपारी झोपणे, कश्शाकश्शात त्याला रस वाटेना. कधीतरी मोठ्या हॉटेलात किंवा बारमध्ये वेळ घालवण्यात गम्य वाटेना. फुरसतीच्या वेळी त्याला थकल्यासारखे वाटू लागले. तो घरातच डोके धरून बसून राहू लागला. रात्री झोप चांगली लागेना. दोन दिवस मध्यरात्री उठून त्याने आंघोळ केली. सिगरेट ओढीत रात्रभर खोलीत येरझारा घालीत राहिला. मन बधिर होत चालले. भावना गोठत चालल्या. केवळ काळजी, काळजी हाच त्याचा छंद झाला. मन कल्लोळांनी भरून गेले.

हळूहळू त्याच्या लक्षात येऊ लागले, त्या दिवशीचे ते अपशब्द ऐकल्यापासून एक भूत त्याच्या डोक्यात संचार करायला लागले होते. एक विचित्र सवय त्याला जडली. सारखे आरशात पहायचे. दाढी करायचा छोटा आरसा तो जवळ बाळगायचा. एक दिवस बारकाईने त्याने आरशात पाहिले. त्याचे ओंठ थरथरत होते. आरशातल्या प्रतिमेत शब्द उमटत होते. 'बॅस्टर्ड, बॅस्टर्ड' प्राण एकवटून त्याने ते शब्द ऐकले. थरथरणाऱ्या ओठांतून बाहेर पडणारे शब्द ! तो घाबरला. अशाने वेड लागेल आपल्याला !

एक दिवस मध्यरात्री तो उठला. महिना जूनचाच. खूप उकाडा होता. त्याने टेबल-लॅम्प लावला. राजीनामा लिहिला. बरोबरच एक पत्र लिहिले. आईला. "माझी नोकरी गेली. माझ्याबद्दल आता जास्त आशा बाळगू नकोस. अजून दोनतीन महिने तुला कष्ट काढावे लागणार आहेत. इत्यादी," पत्र लिहून झाले. त्या रात्री त्याला गाढ झोप लागली.

हौस म्हणून घेतलेल्या दोनच वस्तू त्याच्याकडे होत्या. एक शेल्फ आणि एक बुक केस. त्यासुद्धा भाड्याच्या. रूपश्री फर्निचर्सकडून एक दिवस हातगाडी आली, त्या वस्तू घेऊन गेली. हातगाडीवर एकावर एक रचलेल्या वस्तूंवर त्याने नजर फिरवली. तीच नजर साऱ्या घरातून फिरवताना त्याला हलके वाटू लागले. घर मोठे दिसायला लागले. 'चला, एकदाचे ह्या ऋणातून मुक्त झालो. त्याने सुटकेचा निश्वास सोडला. मनाशी हिशोब केला. फर्मकडून मिळणाऱ्या प्रॉव्हिडंट फंडमधून आणखी काही दिवस तो ती जागा ठेवू शकणार होता. त्याची जागा सुंदर होती. जवळ स्वतंत्र बाथरूम होती.

खूप दिवसांपासून श्यामने सुती कपडे घालणे सोडून दिले होते. तो टेरिलिन किंवा सिल्कचे कपडे घाली, वर टाय बांधी. ट्रंक उघडून, त्या कपड्यांकडे त्याने डोळे भरून पाहून घेतले. ते कपडे घालण्याची त्याला इच्छा होईना. त्याने कपडे वरखाली केले. ट्रंकेच्या तळाशी असलेले सुती कपडे काढले. पॅंटचा घेर १८ इंची तर शर्टचा रंग जुनाट. ते कपडे अंगावर चढवले तसे त्याला हसू आवरेना. तोच पोशाख करून श्याम नोकरीच्या शोधात हिंडू लागला.

'नोकरी ! हूँ, मिळेल सावकाश. तरुणांना कुठंही नोकरी मिळेल. जरा वेळ लागेल एवढंच. आपण हरी मुजुमदारची फर्म का सोडली ? काय भानगड ? कशामुळं ? एवढा मोठा एंजीनियर. शेल् डिजाईनमध्ये त्याचा हात धरणारा कुणी नाही, पण, देशी फर्म त्याचा देशी अहंकार ! नाहीतर अशा माणसाला आपण का सोडलं असतं ? '

त्याला वाटले, 'खोलवर प्रहार झालेली जखम जशी चिघळावी तशी हरी मुजुमदारची ख्याती सडत चाललीय '.

तीन महिने उलटले. गुडघ्यात डोके खुपसून निराश मनाने श्याम बसून राहिला. एक दिवस चौरस्त्यावर गर्दीमध्ये सिगरेट ओढत ओढत तो स्वतःशीच पुटपुटला, " मी संपलो. "

दुसऱ्याच क्षणी तो दचकला. सैरावैरा इकडेतिकडे भटकू लागला आणि एक दिवस, हातात आरसा घेऊन जिराफासारखी उंच मान करून आरशात पहाता पहाता त्याच्या मनात आले, 'ह्या उंच गळ्यावर ब्लेडचं धारदार पातं ठेवून द्यावं. जरा दाब दिला की एकदम आराम ! '

त्याने तसे केले. थोड्याच वेळात रक्ताचे ओघळ गंजिफ्रॉकवरून छातीवर वहायला लागले.

हातातली ब्लेड टाकून तो जोरात हसू लागला. 'हूं, नुसतं नाटक, ' टॉवेलने त्याने गळा पुसला. चेहरा पुसला. खिडकीतून पाहिले. रस्त्यावरून माणसे चालली होती. जिवंत. जखमेवर त्याने ओला टॉवेल ठेवला. डोळे मिटून स्वतःशीच म्हणाला, " आहा, किती बरं वाटतंय !"

दोनच गोष्टींचा त्याला छंद होता. टेलिफोन करायचा आणि रोज सकाळी दाढी करायचा. ऑफिसमध्ये त्याच्या टेबलावर टेलिफोन आल्यापासून ह्याला, त्याला, सर्वांना तो उगाच फोन करीत राहायचा. किती जणांना त्याने आपला नंबर दिला

होता त्याला मर्यादाच नव्हती. टेलिफोनवर लोकांचा आवाज ऐकण्यात आणि स्वतः 'स्टायलिश' बोलण्यात त्याला विलक्षण आनंद मिळायचा.

नोकरी गेल्यानंतर सहा महिन्यांत त्याने फक्त दोनदा टेलिफोन केला. पहिला फोन त्याच्याच ऑफिसात. प्रॉव्हिडंट फंडचे पैसे मिळतील का ह्याची चौकशी करायला. दुसरा फोन केला ' इतू 'ला. इतूशी त्याची पहिली ओळख झाली होती एका हॉटेलात. तिथून कितीदातरी तिला सोडायला तो तिच्या घरापर्यंत गेला होता. शेवटपर्यंत गोडी होती. पण ज्या विवाहात प्रेम नाही त्यात केवळ तडजोडीनेच राहायचे. फोनवर श्याम तिच्याशी बोलत होता.

श्याम––इतू, कशी आहेस ?

इतू––ठीक आहे. दोन महिने तुझं दर्शन झालं नाही.

श्याम––माझी वाट पहात होतीस ?

इतु––होय. दोनेक महिन्यांपूर्वी तुझ्या ऑफिसमध्ये फोन केला.

श्याम––काय सांगितलं ?

" तुला नोकरीवरून काढलं असं म्हणाले "

" नाही, मीच नोकरी सोडली. "

" का ?"

" ही कॉल्ड माय नेम्स. "

" कोण ?"

" मि. बोस, बॅस्टर्ड. "

इतू थोडा वेळ गप्प.

" इतके दिवस काय केलंस ? नोकरी शोधत होतास ?"

" हूं. "

" मिळाली ? पहिल्यापेक्षा चांगली ?"

" नाही. "

" काय करणार आहेस ?"

श्याम हळूच हसला. " लग्न करावंसं वाटतंय. आधीच खूप उशीर झालाय. "

" छान ! कुणाशी ?"

"तू तयार आहेस ?"

"हूं, आत्ता ? या क्षणी ?" बोलता बोलता इतूचा गळा दाटून आला. भारदस्त, प्रौढ स्त्रीसारखा झाला तिचा स्वर.

"श्याम, माझी छोटीशी नोकरी आहे. त्याशिवाय काही दागिने आहेत. . . . ."

हळूहळू श्यामने रिसीव्हर खाली आणला. पेंगुळलेल्या मुलाला आईने जसे झोपवावे त्या हळुवारपणे त्याने फोन खाली ठेवला.

हल्ली श्यामची दाढी वाढलेली असे. हनुवटीवरची सुंदर खळी त्याच्या चेहऱ्यावर शोभून दिसे. ती खळी आता दाढी वाढलेल्या चेहऱ्यात दडून गेली होती. चेहरा चैतन्यहीन झाला होता. डोळे निस्तेज दिसत होते. वाढलेल्या दाढीमुळे डोळे निस्तेज का दिसावेत ? श्यामच्या लक्षात येत नव्हते.

वेळ जात नव्हता. कधीकधी बस टर्मिनसपर्यंत फिरून यायचा. वेळ चांगला जायचा. एक दिवस बालीगंजपासून निघणाऱ्या बसमध्ये बसला. भवानीपूरला बस बंद पडली. श्याम उतरला. समोर सिनेमा थिएटर होते. तो आत शिरला. सिनेमाचे नावही त्याने वाचले नाही. पोस्टरवरच्या चित्रांकडेही पाहिले नाही. तिकीट घेतले. सिनेमा चालणारा नसावा. गर्दी दिसत नव्हती.

आत शिरताच टॉर्चचा झोत पडला. भुतासारखा एक हात पुढे आला. श्यामने त्या हातात तिकिट ठेवले. पाठोपाठ जाऊ लागला. सीट दाखवून तो परत वळताच श्यामला जाणवले, हा मानुमामा. त्याने हाक मारली. टॉर्चवाल्याने चमकून मागे पाहिले.

"अरे, श्याम ?"

इथे मानुमामा नोकरी करतो हे श्यामच्या कधी लक्षात राहायचे नाही. वृन्दा-बरोबर तो इथेच सिनेमा पहायला आला होता. तेव्हाही त्याच्या लक्षात नव्हते. मानुमामानेच त्यांना सीट्स् दाखवल्या होत्या. पण मानुमामा चाणाक्ष खरा ! त्या दिवशी त्याने श्यामला ओळख दाखवली नव्हती आणि बोलणेही टाळले होते. तरीसुद्धा सिनेमा संपेपर्यंत श्यामचे हृदय धुगधुगत होते. 'परत अशी वेळ येऊ नये.' श्याम खूप खट्टू झाला होता.

आज मात्र हातात टॉर्च घेतलेल्या मानुमामाला त्याने हाक मारली. विचारले, "ठीक आहे ना ?"

काय वाटले कोण जाणे, खाली वाकून त्याने मानुमामाला नमस्कार केला. वीस-पंचवीस जणांनी तरी हे दृश्य पाहिले. अंतर्यामी सुखावून मानुमामा म्हणाला,

" तुला ओळखलं नाही. वाळलास. दाढी वाढवलीय. काय होतंय ?" हसत हसत श्याम म्हणाला, " तुरुंगातून सुटलो. "

" तुरुंगातून ?"

" वेडयाच्या. "

गोंधळून मानुमामा म्हणाला, " नोकरीचं काय झालं ?"

" गेली. "

दाराकडे पाहून मानुमामा म्हणाला, " तू बस, मी जाऊन येतो. "

श्यामला हसू आले. क्षुद्र गोष्टींबद्दल त्याला घृणा होती. ' काय सांगावं ? मानुमामाला कदाचित बरंही वाटलं असेल. ' नातेवाईकांपासून श्याम दूर राहिला होता. त्यांच्याशी त्याचे जमायचे नाही. त्याचे काही वाईट झाले की ह्यांना गुदगुल्या व्हायच्या.

इंटरव्हलनंतर अंधार झाला. अंधारातच त्याच्या हातात द्रोण खुपसला गेला. त्याने पाहिले. मानुमामा शेजारच्याच खुर्चीवर बसला होता. हातात चण्याचा द्रोण खुपसून त्याच्याकडे पाहून हसत होता. नजर मिळताच म्हणाला. " माझ्या मोठ्या मुलाला, विष्णूला एकदा तुझ्याकडं पाठवीन. त्याच्याबरोबर आमच्या घरी ये. आमच्या वाड्यात एक तांत्रिक राहतो. जबरदस्त आहे. सगळे रोग दूर करतो. त्याला दाखवू. "

श्याम हसला. म्हणाला, " बरं. "

भुतासारखे त्या अंधारात मानुमामा अदृश्य झाले. श्यामने दाढीवरून हात फिरवला. आपले घाणेरडे कपडे, निस्तेज डोळे पाहून कदाचित् मानुमामांना मनोमन वाईट वाटले असेल. त्यांचा गैरसमज दूर करायला हवा. अंधारातच त्याने हाक मारली. " मानुमामा !"

मागच्या खुर्चीवरून एक राठ पंजा त्याच्या खांद्यावर पडला, लगेच हास्याच्या स्वरातले शब्द आले,

" हळू बाबा, आता सिनेमा बघा, मग मामाला शोधा. "

" साला. " श्याम पुटपुटला.

निर्विकार चेहऱ्याने पडद्यावरची चित्रे पाहू लागला. मनात आले, मामाचा गैर-समज दूर करायला गेलो तर आणखीनच गुंतागुंत होईल. थोड्याच दिवसांत सगळ्या नातेवाईकांमध्ये होईल. " श्यामला वेड लागलंय. तो चक्रमसारखं करतोय. "

स्वत:शीच हसून त्याने खुर्चीच्या पाठीवर मान टाकली. हळूहळू त्याला झोप लागली.

नोकरी गेल्यापासून हॉटेलात दोन्ही वेळा जेवायच्या वेळी सुबोध मित्रशी भेट व्हायची. गप्पा व्हायच्या. रात्री टेबलावर समोरासमोर बसल्यानंतर, एक दिवस सुबोध मित्र म्हणाला, " संसारबिसार सोडून संन्यास घ्यायचा विचार दिसतोय. दाढी वाढवलीय. चेहरा निरिच्छ दिसतोय. "

" संसार असेल तर सोडणार ! " श्याम म्हणाला.

" का ? आईवडील आहेत. त्यांच्यासाठी एखादी दासी आणून टाक. "

" तू का आणीत नाहीस मग ? "

सुबोध एकदम गंभीर झाला. दीर्घ श्वास सोडून म्हणाला, " माझ्या आयुष्याची ट्रॅजेडी झालीय. "

थोडा वेळ कोणीच बोलले नाही. मग हसून सुबोध म्हणाला, " प्रेमभंग. "

" तिचं लग्न झालं. मी लग्न करावं म्हणून तिनं मला खूप विनवणी केली. मी प्रतिज्ञा केली होती. लग्न केलंच नाही. आता वाटतं, सगळा मूर्खपणा होता. प्रतिज्ञेचं मोल काय ? "

" हुरहूर " श्याम मृदू स्वरात म्हणाला.

" काय सांगायचं ? हृदयात धडधडल्यासारखं होतं. " भरल्या गळ्याने सुबोध म्हणाला.

" आवाज येतो ? "

" आं ? " सुबोधचे लक्ष नव्हते.

" काही नाही. "

जरा पुढे झुकून सुबोध म्हणाला, " माझं वय तेहतीस. आम्ही मैमनसिंगचे. एक बहीण होती. तिला कांचडापाडाला दिली. छोटा भाऊ सहारणपूरला नोकरी करतो.

फिटर आहे. फुटबॉल उत्तम खेळतो. राहिलो आई अन् मी. ती गेल्यावर एक नोकर ठेवला होता. तो चोऱ्या करायला लागला. त्याला काढून टाकलं. तेव्हापासून इथं येतो. पण पोटाला सोसत नाही. आई गेल्यापासून घर सुनंसुनं वाटतं. "

इतके सगळे श्याम प्रथमच ऐकत होता. सुबोधच्या वयाबद्दल त्याला शंका होती. अजूनही लग्नाच्या आशेने सुबोध ७–८ वर्षे वय कमी सांगत होता.

सुबोधचा उजवा हात वाळून गेला होता. तिकडे लक्ष जाताच किळस येऊन श्याम झटकन् उठला. म्हणाला, " भेटू, फिर मिलेंगे '!

आंचवताना बेसिनवरच्या आरशात त्याला त्याचा चेहरा दिसला. तेलकट ! वाढलेली दाढी, खूप दिवसांत तेलपाणी न मिळालेले रूक्ष, रखरखित केस. एखाद्या वेड्यासारखा दिसत होता चेहरा.

रोज दाढी करायच्या आरशात तो आपला चेहरा पहात होता. ह्या मोठ्या आरशात तोच चेहरा त्याला वेगळाच दिसत होता. आपल्या डोळ्यात काहीतरी, गूढ संदिग्ध बदल घडून येत आहे. त्याच्या मनाला शंका चाटून गेली.

आंचवून तो बाहेर पडला. डिसेंबर महिन्यातल्या थंडीच्या रात्री कित्येक वेळा लूतभरल्या कुत्र्यांना तो ओलांडून गेला होता. हातगाडीखाली नाहीतर इमारतीच्या भिंतींना टेकून हाताची उशी डोक्याखाली घेऊन झोपलेल्या भिकाऱ्यांना तो कित्येक वेळा ओलांडून गेला होता.

थंडी पडली होती. धुके पसरले होते. समोरच एक पार्क होते. लोखंडी बार्समधून तो आत शिरला. बाके रिकामी पडली होती. एका बाकावर तो टेकला. सिगरेट शिलगावली. हिरवळ दवाने भिजली होती. तिचा थंडगार स्पर्श अंगावर काटा आणीत होता. धुक्याने वातावरण धूसर झाले होते. त्यातच जळक्या लाकडाचा नि कोळशाचा वास मिसळून गेला होता.

स्वस्थ चित्ताने श्याम बसून राहिला. त्याने घड्याळात पाहिले नाही. श्याम, फार उदास, उदास दिसतो आहेस रे, त्याचे मन त्याची खंत करीत होते.

आकाशात ढग नव्हते. तारे नव्हते, काही दिसत नव्हते. धुराने भरलेल्या आकाशासारखे, धुक्याने आकाश भरून गेले होते. दूरवरून सावकाश जाणाऱ्या ट्रामचा आवाज आला. अंधारात कुठेतरी शिशिरातल्या पानगळीचा मृदू आवाज येत होता. कोपऱ्यातल्या म्युनिसिपालटीच्या दिव्याचा मन्द उजेड पडला होता. त्या उजेडात

धुक्याला फिक्कट पिवळा रंग चढला होता. किती फिक्कट ! त्या फिक्कट प्रकाशात श्यामची सावलीसुद्धा दिसत नव्हती.

श्यामच्या मनात आले, आयुष्यातला परिपूर्ण काळ हाच ! आता त्याचे मन मुक्त झाले होते आकाशाला गवसणी घालणाऱ्या महत्त्वाकांक्षेतून !

नोकरी जाऊन सहा महिने झाले होते. साठलेला पैसा हळूहळू संपत चालला होता. तरीसुद्धा श्यामला त्याची खंत वाटत नव्हती. काळजी नव्हती.

धोतर, शर्ट आणि अंगावर शाल. सहा महिन्यांपूर्वी त्याला हे कपडे आपण कधी घालू अशी कल्पनाही करवली नसती. दुपारी ऑफिसात त्याचे साग्रसंगीत लंच व्हायचे. रात्री जेवण्याचे ठरलेले एक ठिकाण नसायचे. कंपनीच्या क्लाएंटपैकी कोणी ना कोणी त्याला बड्या हॉटेलात घेऊन जायचे.

श्यामला आत्ता वाटले, ' छे ! छे ! ते सर्व स्वप्न होतं. ' त्या मोहामध्ये त्याचे मन गुंतले नव्हते. मनात आले तर ह्या सर्व गोष्टी मिळविण्यासाठी तो काहीही करू शकतो. कोणतेही पाप. आश्चर्य म्हणजे ह्या गोष्टींकडे त्याचे मन आता ओढ घेत नव्हते. कशासाठी ह्या गोष्टी करायच्या ? काय मिळवायचे हे करून ? त्याची उंच महत्त्वाकांक्षा मरगळून गेली होती. कुठे गेली होती ? केव्हा नष्ट झाली होती ? राग, चीड, उद्वेग कुठे गेले सारे ? त्याला समजत नव्हते. मन खचले होते.

त्याला सुबोधची हकीकत आठवली. अंधारातच तो स्वतःशी हसला. चाळिशीला आलेला सुबोध वखवखल्यासारखा लग्नाच्या गोष्टी करीत होता. श्यामने थोडी उत्सुकता दाखवली असती तर जेवताजेवता सुबोधने त्याला सगळी प्रेमकहाणी ऐकवली असती. पण ह्याः, पोरींच्या गोष्टी श्यामला भुलावण घालू शकत नव्हत्या.

वृन्दाला त्याने प्रथम एका हॉटेलात पाहिले. बरोबर एक स्टायलिश पोरगा होता. श्यामला जाणवले होते, दोनदा तिने आपल्याकडे पाहिले. बरोब्बर दोनदा. परमेश्वराचे आभार ! कारण, तिने पाहिले त्याच अँगलला आपला चेहरा चांगला दिसतो. डावा अँगल सर्वांत सुंदर ! आपण सरळ उठलो. तिच्या टेबलाशी गेलो. हात पुढे केला नि विचारले, " मॅच बॉक्स ?" नजर वृन्दाकडे होती. त्या स्टायलिश पोराने मॅचबॉक्स दिली. सिगरेट पेटवताना आपण हसून वृन्दाकडे पाहिले. टिपिकल हसणे. कलकत्त्यातल्या बदमाष दादाकडून ते आपण उचलले. हॉटेलच्या बाहेर सतत फेऱ्या घालीत असताना आपण ते न्याहाळले होते. दुसऱ्या दिवशी वृन्दा एकटीच

त्या हॉटेलात आली. कशासाठी आली होती ? प्रियकरासाठी ? आजही मला त्याचा उलगडा होत नाही. त्यानंतर अनेक वेळा वृन्दाला दूरवर नेले.

माधवी घेतली तरी काय ? माधवीला त्याने प्रथम पाहिले फिल्म क्लबमध्ये. तिच्या निळ्या प्लिमाऊथ गाडीचा त्याच्या भाड्याच्या टॅक्सीने वाघासारखा पाठलाग केला. नंतर एक दिवस माधवीला, छे, माधवीच त्याला म्हणाली, "श्याम कसा होत चालला आहेस दिवसेंदिवस ? इतरांसारखं टक लावून पहायला शिकला आहेस. बोलता बोलता शरीराला तिने मजेशीर हेलकावे दिले. नितंबांचे हेलकावे—पार विचलित केले आपले तरुण रक्त त्यांनी. तेव्हा म्हणाली, "माझं मन झालंय हंसाचं शरीर, त्यात झुळझुळतोय विमुक्त वारा, आणि सळसळतंय ताजं रक्त !"

कुठल्याच पोरीपुढे आपण कधीच गुडघे टेकले नाहीत. कधी विनवणी केली नाही. कधी प्रेमाची भीक मागितली नाही. 'तुझ्याशिवाय जगू शकणार नाही' अशी अगतिकताही कधी दाखवली नाही.

केवळ ही इतू, ही सामान्य पोरगी. एक दिवससुद्धा लग्नाची आठवण दिल्याशिवाय राहिली नाही. स्वतःही विसरली नाही. वयाची चाळिशी येईपर्यंत हीच एक पोरगी आपल्यावर प्रेम करीत राहिली. 'प्रेम म्हटलं की, राव, आपलं तर डोकं भडकतं. ओठावर हसू फुटतं.' प्रेमाला आपण इतकीच किंमत दिली. भीती ह्या सामान्य पोरींची वाटते. चार दिवस कुठे भेट, गप्पा झाल्याबरोबर एक दिवस सांगायला लागली, "बाबांनी तुला घरी बोलावलंय. तुला पहायचंय त्यांना."

"मित्र महाशय, आपली जूलिएट कशी होती ? अशीच सामान्य असणार, पण ह्या वयात आपल्याला अर्धा संन्यासी बनवून गेली. लग्न करणार ? तुझ्या नशिबी बहुतेक असली सामान्य पोरगीच असणार. शिवाय आणखी एखाद्याला असाच संन्यासी बनवून, त्याला सोडून तुझ्या घरी ती निश्चिंत मनाने येणार. बरोबर आपल्या प्रियकराच्या स्मृती घेऊन. चंदनाची पेटी, तीत प्रेमपत्र. समोर पानांचा डबा घेऊन मनातल्या मनात त्याची पारायणे करणार.

देवा, देवा ! मी भाग्यवान. माझ्या शरीरात झुळझुळतोय विमुक्त वारा आणि सळसळतंय ताजं रक्त. कधीच कुठल्याच पोरीसमोर आपण गुडघे टेकले नाहीत. आपलं मन म्हणजे हंसाचं शरीर !"

"हूं, किती विचित्रपणं वागलो आपण पोरींशी आजपर्यंत. कोणाच्याच पदरात कधी गुरफटलो नाही. विशुद्ध! निष्कलंक! आणि आज आपली अवस्था!

आपल्यालाच पाहावत नाही आपल्याकडं !" त्या टरबूज विक्रेत्याचे बोलणे त्याला आठवले, तो म्हणाला होता, " परमेश्वराकडून काय आपण फक्त चांगल्याच गोष्टींची अपेक्षा करावी ? मग टाकाऊ गोष्टी कुणी पत्करायच्या ?" 'तशी आपली अवस्था काही अगदीच खराब नाही. नोकरी नाही. ठीक आहे. पण कधी करावीशी वाटली तर मिळेल. तोपर्यंत नुसतं हिंडणं. जर दाढी केली, सहा महिन्यांपूर्वीचे कपडे घातले, पॅन्ट, शर्ट, टाय, डोळ्यात पूर्वीचीच चमक आणि ओठावर हसू आणलं तर चारच दिवसांत चंद्राचं तेज यायला काय वेळ लागणार ? पण घोडं पेंड खातंय इथंच, तो उत्साह येत नाही. जांभई येतेय.'

श्यामला जांभई आली. धुके अधिकच दाट होत चालले होते. थंडी वाढत होती. दूरवरून गुरख्याच्या काठीचा फूटपाथवर ठक् ठक् आवाज येत होता. घड्याळात पहायचा त्याने प्रयत्न केला. अंधारात काटे दिसेनात. कुत्रे रडत होते. गाण्याचे विरळ स्वर कानांवर पडत होते, श्याम उठला.

त्या रात्री हातात आरसा घेऊन स्वत:च्या मनाला तो सारखा एकच प्रश्न विचारीत होता. " उदास, इतका उदास का झालोय मी ?" एखाद्या पवित्र मंत्राचा जप करावा तसे त्याचे ओठ हेच शब्द परत परत उच्चारीत होते. बिछान्यावर लोळता लोळता त्याच्या मनात हेच शब्द उठत होते. रात्री दिवा तसाच ठेवून तो झोपून गेला.

थंडी पडायला लागली होती. कलकत्त्याची थोड्या दिवसांची थंडी, थंड वारे वाहायचे. रोज सकाळी धुके आणि सूर्याचे लाल किरण पडायचे.

साडेआठला ऑफिसात जाण्यासाठी पूर्वी श्यामला लवकर उठावे लागे. तीच सवय अंगवळणी पडली होती. सकाळी खिडकीकडे पहायचा. लहान मुलांसारखी हाताची कड डोळ्यांसमोर धरायचा. डोक्यावर पांघरूण ओढून घ्यायचा आणि प्रकाशाला दूर ठेवायचा. अंगात कसकसल्यासारखे वाटे, थंडीने डोके धरल्यासारखे वाटे मग तो परत झोपून जाई.

पूर्वी तो उठल्याबरोबर व्यायाम करायचा. शरीर सुडौल ठेवण्यासाठी आसने करायचा. आठवण होताच त्याला जांभई आली. डोळे मिटून तो आपले पहिले रूप पाहू लागला. टेबलावरच तो हातपाय हालवायचा. केव्हा केव्हा जमिनीला पायाच्या अंगठ्याने स्पर्श करायचा प्रयत्न करायचा. कधीकधी अदृश्य असलेल्या प्रतिपक्षाचा पाठलाग करीत घरभर पळायचा. एकदा रूपश्री फर्निचर्सकडून आणलेल्या फर्निचरला आपटला होता. तर एकदा भिंतीला एवढ्या जोरात टक्कर दिली होती की भिंतीचे

ढेकूळच खाली पडले होते. गम्मत आली. पूर्वीचा श्याम आणि आताचा श्याम ! त्याला हसू आले. भिंतीकडे तोंड वळवून तो परत झोपला.

आपल्या देहावर त्याचे फार प्रेम होते. स्वतःला न्याहाळून तो त्याची निगा ठेवायचा. स्वतःला संभाळून रस्ता पार करी. जिना चढणे किंवा उतरणे स्टायलिश असायचे. रुबाबदारपणे टेलिफोन कानाजवळ नेई. प्रत्येक हालचाल मन देऊन व्हायची. कुरूपता कुठे दिसायची नाही.

डोक्यावरून ब्लँकेट ओढून श्याम पडून राहिला. ब्लँकेटमधल्या पोकळीत त्याचा श्वासोच्छ्वास खेळू लागला. ताप चढू लागला होता. तोंडावरचे पांघरूण दूर केले तसा डोक्यावर प्रकाश येऊ लागला. त्याला उठावेच लागले. सिगरेट पेटवून तो अंथरुणात उठला. आंघोळ करावीशी वाटेना पण चहा घ्यावासे वाटत होते. चहाचा सरंजाम त्याने घरातच ठेवला होता. रॉकेल, स्टोव्ह, चहा, किटली, सारे काही. पूर्वी ऑफिसला जायच्या आधी तो चहा करायचा. अंडे उकडून खायचा. आणि आता ? चहावर बुरशी धरली होती. दूध नासून गेले होते. डबे उघडून त्याने पाहिलेही नव्हते. टेबलाखाली वर्तमानपत्र पायाशी लोळत होते. मागे त्याच वर्तमानपत्राला केवढा मान मिळत होता. सकाळी बाहेर पडायच्या आधी श्याम एकदा त्यावरून नजर फिरवायचा. रात्री संपूर्ण पेपर उलटसुलट करून वाचून संपवायचा.

ऊन वाढायला लागले होते. हॉटेलच्या दिशेने तो बाहेर पडला. सरळ बस-स्टॉपच्या दिशेने निघाला. बसचे स्टॉप्स, ट्रामचे टर्मिनस मोकळे पडले होते. ओळखीचे कोणी दिसत नव्हते. दिसले असते तर श्यामने त्यांना चुकवले असते. गालावर दाढी वाढली होती. केस वाढले होते. हळूहळू तो अशक्त होत चालला होता. अवकळा आल्यासारखा दिसत होता. चालता चालता ओळखीचे चेहरे चुकविण्यासाठी तो खूप वेळ त्याच पावली मागे फिरला होता. त्यासाठी त्याने गॉगल्स वापरायलाही सुरवात केली होती. एकूण, आता त्याची वेशभूषा नामांकित झाली होती, ह्याच अवतारात कधीतरी एखादा ओळखीचा माणूस दिसायचा.

एकदा माधू दिसला. जाम फॅट झाला होता. सगळी चरबी. थुलथुलित शरीरावर थंडीच्या दिवसांतही घाम आला होता. घामेजलेल्या, सुस्त नाकावरचा चष्मा सारखा वर सारीत होता. एका सॅण्डलचा पट्टा तुटला होता. ट्राममध्ये ते तुटलेले सँडल हातात धरून माधू गंभीर चेहऱ्याने बसला होता.

श्यामने निरखून पाहिले. अंगावर कोरा पंजाबी स्टाईलचा रेशमी झब्बा, धुतलेले

धोतर, खांद्यावर शाल, त्याखाली काखेत अडकवलेला शान्तिनिकेतनी झोळणा. वर्षापूर्वी भेटला होता. कुठल्याशा खेडेगावात मास्तरकी करीत होता. आईला कॅन्सर झाला होता. सुट्टीत कलकत्त्याला यायचा. जेव्हा जेव्हा भेटायचा तेव्हा तेव्हा म्हणायचा, " कलकत्त्यात एक नोकरी दे श्याम, खेडेगावात मजा नाही, शिवाय आईला कॅन्सर आहे. "

माधू तेव्हा उद्‌ध्वस्त दिसायचा. श्यामबरोबरही संकोचाने वागायचा. नोकरासारखा. मित्रासारखा जवळिकीने कधीच वागला नाही.

श्याम पुढे गेला. गर्दीमध्ये बारला धरून तो उभा राहिला. लक्ष माधूकडे जात होते. माधू सुखासीन दिसत होता. सॅण्डलचा पट्टा तुटला होता म्हणून थोडासा अस्वस्थ वाटत होता इतकेच.

कोणाला पैसे उसने दिले तर श्यामच्या ते लक्षात राहायचे नाही. पण आश्चर्य म्हणजे आज माधू दिसताच त्याला आठवण झाली. मागे २५ रु. त्याने माधूला दिले होते. त्याच्या मनात आले, ' माधूची परिस्थिती ठीक दिसतेय. माधूजवळ पैसे मागितले तर ?' विचार येताच त्याच्या शरीरातून शिरशिरी उठली. गर्दीतून धक्काबुक्की करीत तो पुढे सरकला. पण मध्येच थांबला. " साला हरामी, कृतघ्न, विश्वासघातकी, " मनातल्या मनात त्याने त्याला शिव्या दिल्या.

माधूच्या जवळ त्याची बायको बसली होती. छोटीशी, सुंदर साडी नेसून. इतका वेळ गर्दीमुळे त्याला ती दिसली नव्हती. शंकाच नको. ती माधूचीच बायको होती. खिडकीवर ठेवलेल्या हातावर रेलून बसली होती. खिडकीबाहेर पहात होती. उंच मान करून श्यामने पाहिले. दाढीचे वाढलेले खुंट पुढच्या माणसाच्या मानेला टोचले. वटारलेल्या डोळ्यांनी त्याने श्यामकडे पाहिले. वरमून श्याम मागे सरला.

माधूचा सुखावलेला चेहराच सांगत होता. माधूची आई ह्या जगातून मुक्त झालीय. शेजारी बसलेली माधूची पत्नी म्हणजे तिची शेवटची इच्छा. आईची इच्छा पूर्ण करावी म्हणून त्याने ' चट् मंगनी पट् ब्याह ' उरकून घेतले. सुनेसाठी तिचा जीव अडकला होता. सुनेचे तोंड बघितल्याशिवाय तिला मरण येणार नव्हते. त्याच्या मिळकतीत माधूला लग्न करणे शक्य नव्हते. आई गेल्यानंतर माधूचा खर्च खूप कमी झाला असेल. कदाचित आई मेल्यावर पैसा वाचेल अशा विचारानेसुद्धा बायको आणली असेल.

" साला, कृतघ्न !" अकारणच श्यामला माधूचा राग आला. डोके थंड करून त्याने विचार केला. ' माधूला परत एका संकटात टाकावं. सरळ जावं अन हाक मारावी, " माधू. " माधू दचकेल. आपल्याकडे पाहून हसत म्हणेल, " अरे श्याम, ओळखलं नाही तुला. "

नंतर ?

माधूच्या पलीकडे पहात भुवई उंचावून आपण विचारू " कोण ?"

" अरे, तुला पत्ता नाही ? ही माधुरी, माझी पत्नी. " पलीकडे तोंड वळवून सांगेल, " हा श्याम. माझा दोस्त. "

परत आपल्याकडे वळून म्हणेल, " तुझ्या ऑफिसात चौकशी केली. तुला नोकरीवरून काढलंय म्हणाले. "

" एवढं बोलायचा अवकाश, त्याचा अपमान करायला आपल्याला पुरेसं कारण मिळेल. सर्वांच्या समोर नोकरी गेल्याचा उल्लेख त्यानं का करावा ?"

हळूच हसून आपण म्हणू, " हो गेली. "

घसा साफ करून मग आपण मोठ्याने बोलू. अगदी त्याच्या पत्नीला आणि आसपासच्या लोकांना ऐकू जाईल अशी खबरदारी घेऊन.

" माझे पैसे देणं आहेस तू. "

बावरून माधू विचारेल, " कोणते ?"

" अरे साल्या, आठवत नाही ? गेल्या हिवाळ्यात रात्री येऊन पैसे घेऊन गेलास ते !"

बोलता बोलता आपले लक्ष माधूच्या बायकोकडे असेल. ती घाबरून अस्वस्थ झालेली असेल.

गांगरून माधू विचारेल, " मी ?"

" साल्या, आठव. एका शनिवारी तू रेसमध्ये पासष्ट रुपये घालवलेस. ' पवन-नंदन ' आणि ' टिटानिर 'वर लावले होतेस. आठवत नाही ? धुंदी चढलीय म्हणून आठवत नाही. त्यावर माधू विषय बदलील. श्यामला माहीत आहे, सगळ्या गोष्टी टाळण्यासाठी तो मुद्दामच विषय बदलील. म्हणेल, " फारच रोडावलास. एक दिवस ये ना. कलकत्त्याला आहे मी. नोकरीसुद्धा इथंच करतोय."

मग आपण विचारू, "पत्ता ?"

माधू पत्ता सांगेल. म्हणेल, "इतर दिवशी घरी सापडणार नाही. सुट्टीच्या दिवशी ये. आधी कळव. नाहीतर, सिनेमाला वगैरे गेलेलो असू."

आपणांला पत्ता देऊन खरे तर माधू आणखी एका संकटात सापडणार होता. आपले तरुण पोरींशी वागणे कसे असते हे त्याला माहीत होते. आपल्याला रीतभात नाही. उपचार नाहीत. कुठल्या गोष्टीचे गांभीर्य नाही. तरुण मुलींबरोबर आपण मोकळेपणाने वागतो. शिवाय बायकोवर विश्वास ठेवण्याइतके माधूचे मन खंबीर असेल तर!

विचार करता करता तो हसला. आजूबाजूचे लोक पाहू लागले. माधू काली-घाटावर उतरला. एका हातात सॅण्डल घेऊन संकोचाने तो गर्दीतून वाट काढीत होता. पाठोपाठ बायको. माधूने मागे वळून पाहिले नाही. उतरता उतरता तिचा घामेजलेला पदर श्यामच्या हनुवटीस स्पर्श करून गेला. श्याम खाली उतरला. मान वर करून त्याने पाहिले. माधूची बायको जवळजवळ माधूइतकीच उंच होती. ट्राम सुरू झाली. आता काय करावे, श्यामला उमगेना. ट्राममधला तोच माणूस त्याला घसटून गेला. परत एकदा त्याच्या मानेवर दाढीचे खुंट टोचावे. श्यामच्या मनात आले.

दुसऱ्याच क्षणी त्याला माधूची कणव आली. म्हणाला, "माधू, सुखी रहा. खूप मोठा हो, पंचवीस रुपये तुला माफ केले. तुला आशीर्वाद देतो. तुला नीट चालता येत नाहीय. जवळपासच कुठंतरी तुला चांभार भेटेल." श्यामला खूप समाधान वाटले.

डबलडेकर कॉलेज स्ट्रीटवरून चालली होती आणि अकस्मात श्यामला मिनू दिसला. आरपूली लेनच्या तोंडाशी भिंतीला टेकून उभा होता. काळ्या पॅण्टवर शेवाळी रंगाचा पुल ओव्हर होता. पायात हॉकीचे बूट. एक पाय गुडघ्यात दुमडून भिंतीला टेकवला होता. छातीशी हाताची घडी करून उभा होता. दृष्टी खाली वळवलेली. डुलकी येत होती? क्षणात मिनूने आपली पोझ बदलली. दुमडलेला पाय खाली टेकवून हाताची घडी मोडून तो ताठ उभा राहिला. त्याचा उभट चेहरा तरतरित दिसत होता. 'मिनू' श्यामने हाक मारली. बसमधून उतरायचे त्याच्या मनात आले. बस ठेचून भरली होती. त्या गर्दीतून उतरता उतरता दोन स्टॉप पुढे गेली असती. मग उतरून मागे येईपर्यंत मिनू तिथेच उभा राहिला असता ह्याची खात्री नव्हती. शिवाय भेटण्यात काही फायदा नव्हता. हातातले काम सोडून मिनू ओळखसुद्धा द्यायचा नाही. फारतर थोडेसे हसून म्हणेल, "अरे, श्याम? काय

म्हणतंय ऑफिस ?" तो स्वप्नात असल्यासारखा, भारावलेल्या स्वरातम्हणेल, "आज तुझ्याशी गप्पा मारता येणार नाहीत. फार काम पडलंय."

"कसलं काम ?"

"नसती भानगड उद्‌भवेल. तू जा."

हे सांगताना त्याच्या स्वरांना एक प्रकारची धार येईल. मिनूच्या गळ्यात माइक्रोफोन ठेवलाय जसा काही. त्याचा स्वर उंच नाही. पण एखाद्या खोल विहिरीतून यावा तसा गंभीर आहे. ऐकणाऱ्याच्या छातीत घुसणारा.

आठदहा वर्षांपूर्वी मिनूला एकदा पाहिले होते. श्याम तेव्हा एका कंपनीत २०० रुपयांवर होता. एक तारखेला पगार घेऊन बसमधून चालला होता. बसमध्ये गर्दी होती. श्याम दारात उभा होता. कालीघाट स्टॉपवर बस आली तेव्हा कोणीतरी आपल्याला हाक मारीत आहे असे श्यामला वाटले. बसने स्टॉप सोडला आणि सणसणित लोखंडासारखा पंजा त्याच्या मानेवर पडला. 'बस'च्या दांड्यापासून श्यामचा हात सुटला. त्याचे तोंड गाडीच्या टपावर आदळले. बसमधले लोक किंचाळले. बस थांबेना. बसची दांडी पकडण्याच्या निष्फळ प्रयत्नात धक्का लागून श्याम अडखळून फूटपाथवर पडला. लोकांनी त्याला सावरले. श्यामचे डोळे भरून आले होते. कोणी बँडेज बांधले तेही त्याला कळले नाही. गर्दीत मिनू दिसला. त्याच पोशाखात. शेवाळी पुलओव्हर आणि काळी पॅण्ट ! मिनूनेच त्याला हाताला धरून उठवले. त्याला दूर घेऊन गेला. आपला पोलादासारखा हात त्याच्या खांद्यावर ठेवून म्हणाला, "फार लागलं ?"

"नाही." मान हालवून श्याम म्हणाला.

त्याच्या खांद्यावरून हात काढून पॅण्टच्या खिशात घालून तो काही वेळ स्तब्ध उभा राहिला. त्याची पोझ पाहून श्यामच्या मनात आले, पायांनी पुढे जाऊ नये म्हणून दोन्ही पाय मातीत खुपसून उभा राहिला मिनू !

मिनूचे डोळे फार सुंदर होते. ओढ लावणारे, तरल. पापण्या अर्धवट उघडून झोपेत असल्यासारखा तो सगळीकडे पहायचा.

मात्र भुवई उंचावून, गंभीर होऊन मिनू पहायला लागला की कठोर दिसायचा. मिनू तेव्हा ओळखू यायचा नाही. मिनू म्हणजे एक कोडे वाटायचा.

त्याच्या अर्धवट मिटलेल्या, अर्धवट उघडलेल्या डोळ्यांकडे श्याम पहात राहिला. मिनूला पाहून त्याला फारसा आनंद झाला नव्हता.

श्यामकडे पहाता पहाता मिनू म्हणाला, " आज एक तारीख. पगार झाला असेल ?"

श्यामला वाटले होते, बालपणाच्या गप्पांमध्ये रमून जाण्यासाठी मिनूने आपल्याला बसमधून उतरायला भाग पाडले असेल. पण तो आता समजला होता. आपले वाटणे चूक होते. मिनूला पाहून आपल्याला आनंद का झाला नाही तेही त्याला आता कळले होते. मिनूला 'मित्र' का म्हणावे ? मिनूच्या चेहऱ्याकडे पहात तो अंदाज करू लागला. त्याला भीती वाटली. आजूबाजूचे खूप लोक ये–जा करीत होते तरीही श्यामला अगदी एकटे वाटले. त्याला मिनू भयानक काळाकुट्ट दिसायला लागला. त्याच्या चेहऱ्याकडे पहात श्याम म्हणाला, " हो. झाला. "

" कल्पना आहे. म्हणूनच तुला त्या बसमधून जाऊ दिलं नाही. बस फार गरम होती. "

श्याम कोड्यात पडला.

" बसमधल्या पोरांना मी ओळखतो. त्यांचे हात फार तयार आहेत. तुला समजणारही नाही. "

गोंधळून श्यामने आपला हात खिशाकडे नेला !

" घाबरू नकोस " त्याचा हात आपल्या हातात घेत मिनू म्हणाला, " सगळं आलबेल आहे. "

श्यामला हसू फुटले.

" किती सुंदर डोळे !" खरे तर तेव्हा मिनू त्याच्याकडे पहात नव्हता. 'खूप दूरचं पाहू शकतो मिनू' श्यामच्या मनात आले.

मिनूच्या चेहऱ्यावरचे हसू मात्र अगदी फिक्कट होते. त्या हसण्यात प्राण नव्हता. चैतन्य नव्हते.

पण श्यामला जणू एकदम साक्षात्कार झाला. मिनूमुळेच आज त्याचे पैसे वाचले होते. तरीसुद्धा श्यामच्या मनात मिनूबद्दल कृतज्ञता जागी होत नव्हती. मिनूबद्दल जवळीक वाटत नव्हती. स्वतःच्या विचारांची त्याला लाज वाटली. 'हे ठीक नाही. हे ठीक नाही.' आपली उदासीनता, थंडपणा श्यामला असह्य झाला. तो झटकन् म्हणाला,

" चहा घेणार ? चल, खूप दिवस झाले गप्पा मारल्या नाहीत. " मिनूने जणू काही ऐकलेच नव्हते. श्यामला तो क्षणात विसरला होता. डावीकडे, उजवीकडे,

पाठीमागे पटापट त्याची नजर फिरत होती. कमरेचा पट्टा घट्ट करून तो हसून म्हणाला, "मी एकटा नाही. लोक आहेत माझ्याबरोबर."

श्यामच्या छातीत धडधडले. त्याच्या मागच्या बाजूला चर्च होते. समोर बसस्टॉप होता आणि पार्क होते. शिशिरातली पानगळ टपटपत होती. निष्पर्ण वृक्षावर एक कावळा बसला होता. सगळीकडे माणसांची गर्दी, धुळीने डोकी भरलेली, चैतन्यहीन माणसे. कुठे होती यात श्यामची माणसे ? त्याने विचारले, "कुठं आहेत तुझे लोक ?"

मिनू हसला. म्हणाला, "गर्दीत मिसळून गेलीत. तुला दिसणार नाहीत."

श्यामला माहीत होते, मिनूची मित्रमंडळी वेगळीच होती. म्हणूनच श्यामसारख्या सोवळ्या माणसांना तो आपला पत्ता कधी देत नसे. त्या बाबतीत मिनूपेक्षा तो छोटा होता. लहानपणीची दोघांची मिळून कितीतरी गुपिते असत. इतक्या वर्षांनंतर मिनू जणू अनोळखी झाला होता. कितीतरी गुपिते जमली असतील आतापर्यंत. श्यामला परत जायची इच्छा होईना. त्याला वाटले मिनूला बरे वाटेल अशा अनेक गोष्टी त्याला सांगाव्यात.

"मिनू, तुला काही सांगायचंय." तो म्हणाला.

"काय सांगणार ?" भुवया उंचावून मिनूने विचारले.

"आहे काहीतरी."

मिनूचा चेहरा गंभीर होता. डोळे क्षणभर त्याच्याकडे लावून तो म्हणाला, "ठीक आहे. एक दिवस तुझ्या घरी जाऊ या. मटण शिजवू या. दुपारभर गप्पा मारू या. तुला काय सांगायचंय, ते सांग. ऐकेन."

श्यामने मिनूकडे पाहिले नाही. त्याचे लक्ष रस्त्यावरच्या वळणावर असलेल्या चर्चकडे होते. चर्चच्या रेलिंगला टेकून दोन माणसे जवळ जवळ उभी होती. त्यांनी मिनूकडे एकदाही पाहिले नाही. मिनूनेही त्यांच्याकडे पाहिले नव्हते. हवेतून अवतरल्यासारखे ते दोघे तिथे उभे पाहिले होते. दोघांच्याही हातात सिगारेटस् होत्या. खिन्न नजरेने ते रस्त्याकडे पहात होते. दोघेही धोतरे नेसले होते. शर्ट घातला होता आणि शर्टच्या बाह्या दुमडलेल्या होत्या. वरवर पाहिले तर इतरांसारखे ते दोघेही सामान्यच होते. पण त्यांची उभे राहण्याची ढब आणि नजर पाहून श्यामला वाटले, ही दुष्ट माणसे आहेत. मिनूची त्यांची नक्कीच कुठेतरी भेट झालेली असणार, ही असली माणसे, कसल्या कसल्या भयंकर कामांमध्ये तरबेज असतात. श्यामने

मिनूकडे पाहिले. "तुझ्याबरोबर कोण लोक आहेत म्हणालास मिनू? ते दोघे तर नव्हेत?" श्यामने त्या दोघांच्या दिशेने बोट दाखविले. ताडकन् आपल्या दणकट पंजाने मिनूने त्याचा हात खाली केला.

"बोट दाखवू नकोस. तेच दोघे. आणखी चौघे आहेत. तुझी नजर चांगली आहे. आता घरी जा." श्यामला गंमत वाटली. तो म्हणाला, "थांब, त्या चौघांना मी शोधून काढतो." श्याम इकडे तिकडे पहायला लागला.

खांद्यावर हात ठेवून मिनू म्हणाला, "शोधायला नको. माझ्याबरोबर ये. दिसतील तुला."

श्याम निघाला. दोन चार पावले जाताच मिनू थबकला. मागे वळून म्हणाला, "बघ."

"कुठं?"

"रस्त्याच्या पलीकडे, चहाच्या दुकानासमोर पहा. दोघे उभे आहेत. एकाने पुल ओव्हर घातलाय. पॅण्टच्या खिशात हात घालून उभा आहे. दुसरा उंचापुरा, अंगात बंद गळ्याचा गंजिफ्रॉक घातलाय. पॅण्ट माझ्यासारखीच काळी." श्यामच्या आस्ते आस्ते लक्षात आले. कोणालाही कपटाने पकडायला हेच लोक जाळे टाकतात. त्याचे हातपाय गळाले. तरीसुद्धा उसने अवसान आणून, स्वरात कंप न आणता त्याने विचारले, "आणखी दोघे?"

लांबलांब ढांगा टाकीत मिनू म्हणाला, "ह्या बाजूला ये" नवीन पाहुण्याला ज्या उत्साहाने लोक आपले घर दाखवतात तोच उत्साह मिनूच्या हालचालीत होता. पार्कजवळ येऊन ते उभे राहिले. तिथून जाणाऱ्या गल्लीकडे बोट दाखवून मिनू हसला. म्हणाला, "त्या गल्लीच्या तोंडाशी पहा. मीटर डाऊन केलेली एक टॅक्सी उभी आहे. मागच्या सीटवर एक बसलाय. इथून तो नीट दिसत नाही."

"आणखी एकजण?" श्वास रोखून श्यामने विचारले. मिनूने मान हलवली. म्हणाला, "तो इथं नाही. तो आमच्या कुळाला आणायला गेलाय. भूल देऊन आणील." श्यामला गरगरायला लागले. त्याचे हातपाय थरथरायला लागले. त्याच्या मनात आले. ह्याच ठिकाणी ह्या गर्दीत मिनू एक स्टेज उभे करील. त्यावर आता एक नाटक उभे राहील. पण नाटक कशाला? सत्य कथाच. कारण, मिनूच्या ह्या सगळ्या भानगडीत इथे रक्त सांडणार आहे.

लाकडासारखे निर्जीव हसू श्यामच्या मुखावर पसरले. तरी त्याने विचारले, "तू कुणाला धरलंस ?"

मिनू हसला नाही. त्याच्या कपाळाला आठी पडली. डोळ्यातले भाव कठोर झाले. तरीसुद्धा श्यामला ह्या क्षणी मिनू भयंकर वाटला नाही. ओठाचा चंबू करून मिनू म्हणाला, "कोण जाणे ? मी ओळखत नाही त्याला." श्यामने स्वत:च्या मनालाच प्रश्न केला. "नंतर?" कपाळावर आलेल्या कुरळ्या बटेशी चाळा करीत मिनू उभा होता. श्यामकडे वळून म्हणाला, "तू घरी जा. परत भेटू."

श्याम काहीच न बोलता चालू लागला. थोडे दूर गेल्यावर त्याने वळून पाहिले. मिनू त्याच्याकडेच पहात होता. डोळ्यात बचैनी दिसत होती. श्याम परत फिरला. मिनूला म्हणाला, "ते दोघे तुझे मित्र आहेत ?"

मिनूने आश्चर्याने त्याच्याकडे पाहिले. मग मान हालवून म्हणाला, "होय."

श्यामला कळमळल्यासारखे झाले. मिनूचे काही भले करावे ही त्याच्या मनातली इच्छा आता उचल घेईना. मिनूच्या डोळ्यांत त्याला संदिग्ध भाव दिसले.

मग म्हणाला, "अच्छा मिनू, येतो."

"हां, आच्छा."

"एकदा ये. सुट्टीच्या दिवशी ये."

"हां." मिनूने मान डोलवली मग हसून म्हणाला, "तोपर्यंत राहिलो तर."

श्यामला धक्काच बसला हे ऐकून. मिनूपासून आपल्याला कोणीतरी दूर सारीत आहे असे त्याला वाटले. तो भराभर बस स्टॉपकडे गेला. त्याने परत मागे वळून पाहिले नाही.

चर्चच्या रेलिंगशी, शरीराला हेलकावे देत ते दोघे अजूनही उभे होते. एकदाही त्यांनी श्यामकडे पाहिले नाही. तोंड फिरवून श्याम गर्दीत मिसळून गेला. थंडी नव्हती तरी श्यामचे हातपाय गार पडले होते. छाती धडधडत होती. श्वास घ्यायला त्रास होत होता. मधून मधून श्यामला असे व्हायचे. छाती धडधडणे हा त्याचा फार जुना रोग होता. बस स्टॉपवरची गर्दी, दुकानातल्या दिव्यांचा प्रकाश, दोन्ही बाजूंची झाडे कशातही चैतन्य नव्हते. सर्व निष्प्राण दिसत होते. ह्याच रस्त्याने तो ऑफिसातून यायचा. खच्चून भरलेल्या बसमधून त्याला मिनूने उतरवले होते तोपर्यंत सगळे

कसे सरळ होते. पण आता ? हुडहुडीने पाय गारठले होते. हृदय धडधडत होते. त्याच्या मनात आले, हे शहर आपल्या परिचयाचे नाही. आपला बालमित्र मिनू आपल्या ओळखीचा नाही. त्याचे मित्र आपल्याला ठाऊक नाहीत.

त्या दिवशी मिनूमुळेच त्याला थकवा आला होता. बसमधून उतरताना त्याने स्वतःला सावरायचा प्रयत्न केला नाही. तो हँडल धरून हेलकावे खाऊ लागला. अनेक हात त्याच्या जवळ आले. कोणाचा काय उद्देश होता ह्याची त्याने फिकीर केली नाही.

नंतर पुष्कळ दिवस गर्दीकडे तो त्रासून पहायचा. असे वाटायचे की कठोर डोळ्यांची माणसे आपल्यावर नजर ठेवून आहेत. त्याच्या छातीत धडधडायचे. जणू काही मिनूचे ते दोन मित्र हवेमध्ये मिसळलेत आणि आपल्यावर नजर ठेवीत आहेत. आपली भीती व्यर्थ आहे ह्याची त्याला कल्पना होती. त्याचे आयुष्य इतके सरळ, इतके अळणी होते की आपल्या बाबतीत काही भयंकर घडेल ह्याची शक्यताच हास्यास्पद होती. तेव्हा एखादा भयंकर सूड घेण्याचे काही कारणच नव्हते.

तेवीस, चोवीस वर्षांमध्ये ह्या दयाळू, भीरू श्यामच्या बाबतीत कधी काही घडल्याचे कोणी पाहिले नसेल. बसच्या खिडकीतून कोणी पाहिले असते तर तोच श्याम रस्त्याच्या कडेने जाताना दिसला असता. भिकाऱ्याच्या वाटीत पैसे टाकताना दिसला असता. कुणाचे लक्ष नाही ना, असे पाहून हळूच नमस्कार करून जाताना दिसला असता. विचार करता करता श्यामला हसू आले. " ओ, श्याम, मि. काईन्ड-हार्टेड " हसत हसत तो स्वतःलाच म्हणाला.

नंतर कित्येक दिवस मिनू दिसला नव्हता. काही दिवसांनी श्यामची नोकरी बदलली, त्याचे फिरणे मर्यादित झाले. ऑफिस, हॉटेल किंवा स्वतःचे घर, श्यामला ह्यात आनंद वाटायचा. आणि मिनू गलिच्छ गल्ल्यांमध्ये फिरत असायचा. आड-रस्त्याला असलेल्या चहाच्या हॉटेलात, जुगाराच्या अड्ड्यावर, दारूच्या दुकानात, पारूलच्या नाहीतर चंपाच्या घरी पडलेला असायचा.

दोघेही एकाच शहरात राहात होते. पण किती भिन्न वस्त्या ! जणू एका कलकत्त्यातच दोन कलकत्ता शहरे होती. दोनच का ? अनेक होती. ते दोघे एकाच शहरात राहातच नव्हते. बसच्या डाव्या बाजूला बसलेल्यांना शहराची एक बाजू दिसते. तर उजव्या बाजूला बसलेल्यांना शहराची दुसरी बाजू दिसते. प्रत्येक दिशेला वेगळे कलकत्ता, वरती वेगळे, खाली वेगळे, एक कलकत्ता दुसऱ्या कलकत्त्यात डोकावून पहात आहे जसे !

त्याला वाटले जावे, मिनूसमोर उभे राहावे, त्याच्या खांद्यावर एक थप्पड मारून म्हणावे, "अरे मिनू, कसा आहेस गुरू ? तुझ्या ग्रुपमध्ये मला घेणार ? बघतच राहा साल्या. कसा भसाभस चाकू चालवतो ते, कशा सराइतासारख्या सोडयाच्या बाटल्या फुटतात ते. नंतर त्या अंधाऱ्या गल्लीबोळातले छोटेसे हॉटेल, बायकांची कॅलेण्डर्स तिथल्या भिंतीवर फडफडत असतील. घाणीवरची माशी घोंगावत असेल तिची भुणभूण चालू असेल. समोरासमोर बसू आणि अगदी कुजबुजल्या स्वरात विचारू, "काय घेणार गुरू ? झिट् की ॲन्टिक ? " मिनूला त्याचा अर्थ बरोबर समजे. झिट् म्हणजे गांजा, ॲन्टिक म्हणजे दारू. हळूहळू नशा चढेल. मग आपण म्हणू, " मिनू तुला धुंदी चढलीय. तू प्रौढ झालायस. तू माझ्यापेक्षा सहा वर्षांनी मोठा. मी बत्तीस वर्षांचा आणि तू ? जाऊ दे साल्या, कसं चाललंय तुझं ? पाकेटमारी ? चोरी ? चंपाच्या घरात किती गेले? त्याचा कॅशमेमो ? किती हजार ?

"मिनू घाबरू नकोस. मी तुला चांगले दिवस आणीन. तरुण पोरासारखं माझं रक्त सळसळतंय. वृद्धासारखं डोकं थंड आहे. बातमीदारासारखी दृष्टी तेज आहे. एखाद्याचे जीव वाचवायची, त्यासाठी मरायची माझी तयारी आहे. माझा एकच 'वीकपॉइंट ' आहे. त्यासाठी मी मारामारी करीन. आईबापांवरून शिवी दिलेली मला सहन होणार नाही. "

" आपण काय म्हणताय ?" जवळ उभे असलेल्यांनी पुढे वाकून त्याला विचारले.

श्याम गोंधळला. नकळत तो स्वत:शीच बोलत होता. मागच्या पुढच्या सीटवरचे लोक त्याच्याकडे पहात होते. विवेकानंद रोडशी बस येताच श्याम उतरून गेला.

## ( २ )

सकाळी श्यामला जाग आली. कोणीतरी दार ठोठावीत होते. त्याने दार उघडले समोर इतू उभी होती.

" इतू ?"

" श्याम. "

शुभ्र वेषात इतू उभी होती. सफेत साडी, सफेत ब्लाउझ, हातातली बॅग सफेत, कपाळावरही चंदनाचा टिळा. श्यामच्या सुस्तावलेल्या डोळ्यांना तो पांढरा रंग प्रखर वाटला. डोळ्यांची उघडझाप करीत हसत म्हणाला, "एकतारी कुठं ठेवून आलीस ?"

खिडकीतून सूर्याचे किरण आत आले होते. कोवळ्या किरणांत इतू सुंदर दिसत होती. पवित्र दिसत होती. दारातूनच ती म्हणाली, "काय कळा आलीय घराला, सभ्य स्त्री असल्या घरात पाय ठेवणार नाही."

श्यामने झटकन् एक खुर्ची आणली, पायानेच पसारा दूर सारला. जमिनीवर पसरलेली पुस्तके बाजूला सरकवली. ब्लँकेट घडी करून ठेवले. म्हणाला, "तू येणार असं माहीत असतं तर साफसफाई करून ठेवली असती. बस" त्याने खुर्चीकडे बोट दाखविले.

इतू खुर्चीवर बसली नाही. हातातली पर्स बिछान्यावर टाकून म्हणाली. "हाततोंड धुवून ये. आज दिवसभर बसणार आहे मी."

श्याम हसला.

"श्याम तू फोनवर काय विचारलंस ? माझ्याशी लग्न करणार आहेस ?"

"हूं"

"मी काय म्हणाले ? 'हो' म्हणाले ?"

"हूं."

"आणि बोलता बोलता तू फोन खाली ठेवलास."

"हूं."

"तुझ्या मनात तरी काय आहे ?"

श्याम बोलला नाही. हातात ब्रश घेऊन तो बाथरूमकडे गेला. बाथरूमच्या दारात पाय रोवून म्हणाला, "बस, चहा करतो." त्याने दार बंद करून घेतले.

समोरच्या चुन्याच्या भिंतीकडे तो शून्य मनाने पहात उभा राहिला. सगळे शरीर जड झाले होते. उत्साह कसा तो राहिलाच नव्हता. नळ उघडून थंड पाण्याच्या धारेत त्याने हात धरला. पाण्याचा स्वर कानात गुंजत राहिला. सावकाश त्याने पेस्टचे टोपण काढले.

अर्ध्या तासाने श्यामने स्टोव्ह पेटवला. कितीतरी दिवस स्टोव्ह थंडच होता. चहाच्या सामानाकडे त्याने पाहिलेही नव्हते. दुधाच्या भांड्यात श्यामने वाकून पाहिले, दूध सुकून गेले होते. चहा संपला होता. इतूला ऐकू जाईल अशा स्वरात म्हणाला, " चहा संपलाय. दूध सुकून गेलंय."

" काय सुकून गेलंय ?"

" दूध. "

" दि मिल्क ऑफ ह्यूमन काइंडनेस ?" इतू हसली.

श्यामला खूप जोरात हसू आले. म्हणाला,

" वा, वा, इतू तुझी बुद्धी तेज होत चाललीय हां !"

" चहा राहू दे श्याम, इकडं ये. "

श्यामने डबे शेल्फवर ठेवले आणि खिडकीशी येऊन उभा राहिला.

" ये, श्याम !"

खिडकीच्या कडेवर हात ठेवून, इतूकडे तोंड करून श्याम उभाच राहिला. पाठीवर सूर्याचे किरण पडले होते.

" इतू, तू पवित्र दिसतेस. "

" माहीत आहे. "

" आणखी काही काळ तुला अशीच पवित्र पाहू दे, मग....."

" मग काय ?"

श्याम हसला. हळूच. " मग दिवसभर तू थांबणार आहेसच. थांबशील ना ?"

" नाही. दि मॉर्निंग शोज द डे. जवळ ये श्याम, तुझं काय चाललंय, मला सारं सांग. "

" श्याम, जवळ ये ना, तुला स्पर्श केला की लगेच समजेल मला तुझं काय बिनसलंय ते. " मायाभरल्या स्वरात आईने मुलाला बोलवावे तशा भारलेल्या स्वरात इतूने श्यामला जवळ बोलावले.

श्याम तिथेच उभा राहिला. म्हणाला, " कसं समजेल ?"

" जवळ तर ये. तुला स्पर्श करू दे, मग बघ सांगते की नाही ते. "

हळूहळू श्याम तिच्या दिशेने आला. हात पुढे करून म्हणाला, " घे, स्पर्श कर. "

इतूचा हात पुढे येताच दुसऱ्या दिशेला हात वळवून म्हणाला, " शीव. "

" ओ, श्याम, " इतूने हात पुढे केला. त्याबरोबर दुसरीकडे हात हलवून म्हणाला, " हां, आता शीव. "

" काय चालवलंयस ?" ओठावर हसू दाबून इतू उठू लागली.

" उठायचं नाही. " एक पाऊल पुढे येऊन श्याम म्हणाला.

इतू बसली. श्यामचा शर्ट पकडण्यासाठी ती परत उठली. ओणवे होऊन श्याम झटक्यात दूर गेला.

" धरणार ?" खिडकीकडे जात म्हणाला, " पकड तर खरं. "

" हे काय श्याम ? जवळ ये ना. "

" तू ये. "

" तुला भीती वाटते श्याम ? कितीतरी मुलींना स्पर्श केलायस तू. पक्का लंपट आहेस. "

" ठीक. "

" कसली भीती वाटते श्याम ?" इतू त्याच्याजवळ गेली. त्याच्या खांद्याच्या दिशेने तिने हात पुढे केला. हसत हसत श्याम खाली वाकला.

" भीती कसली श्याम ?" इतू हळूच म्हणाली.

हळुवारपणे तिचा हात खांद्याच्या दिशेने खाली येत होता. त्याच्या खांद्यावर टेकणार तोच श्याम आणखी खाली वाकला. तिच्या तळहाताखालून निसटला. खोलीच्या मध्यभागी आला. इतूचा हात धपकन् खाली आला. काचेच्या बांगड्या खळखळल्या. तिने श्यामकडे पाहिले. हात पुढे करून तो म्हणत होता, " ये ना, शीव. "

" तुला खेळायचंय ?" त्याच्याकडे क्षणभर पाहून इतूने विचारले.

" हो. "

" ठीक आहे. " झर्रकन् इतूने पदर खोचला. म्हणाली, " पकडलं तर माझा जय. "

" कबूल. "

श्यामने दरवाजा बन्द करून घेतला. दोघे समोरासमोर उभे राहिले. इतूचे शरीर सुटले होते. पदर खोचल्यामुळे तिच्या पोटाची वळी दिसत होती. हातावर, गळ्यावर थुलथुलित चरबी दिसत होती. श्यामला आठवले, इतू नाच शिकत होती. सावध होऊन श्याम उभा राहिला.

इतू सरळ आली नाही. धीम्या पावलांनी ती पुढे पुढे सरकू लागली. श्याम मागे मागे जात राहिला. तोंडाने म्हणायचा, " ये, बक अप इतू. " इतू हसायची. थांबायची. श्याम थांबायचा.

घरातला कोपरान् कोपरा श्यामच्या परिचयाचा होता. दरवाजाच्या दिशेने गेले तर उजव्या बाजूला चौरंग, मध्ये खुर्ची, डाव्या बाजूला स्टोव्ह पेटला होता. तो मागे मागे खिडकीच्या बाजूला गेला. पुस्तके एका बाजूला रचून ठेवली होती. एक मोठे पुस्तक टेबलाच्या पुढे आले होते. श्याम त्याला ओलांडून गेला. तो हळू हळू सरकत होता. मध्येच खुर्चीवर हात ठेवून उभा राहात होता. उजव्या बाजूने जाता जाता इतूने पटकन् गती वाढवली. विजेसारखी ती सरळ त्याच्याकडे येऊ लागली. तिचे हात सापासारखे श्यामच्या दिशेला वेळावले होते. हुलकावणी देऊन श्याम निसटला. चौरंगावरून उडी मारून दाराकडे गेला.

" असं काय करतोस ?"

" का ? पकडलंस तर जय तुझा आहे. "

" मला जय नको. तू जवळ ये. "

" इतू, नियम मोडू नकोस. खेळ. "

इतू बिछान्यावर बसली. " अच्छा, आम्हांला नाही पकडायचं तुला. " पाय झुलवीत ती म्हणाली.

श्यामने सिगरेट पेटवली, भिंतीला टेकून शांतपणाने सिगरेटचे झुरके घेऊ लागला. ओठ टिपत इतू दुसरीकडे पहात होती. एकदम श्यामकडे झेपावली, दचकून श्याम बाजूला सरकला. स्टोव्हवर पडता पडता त्याने स्वतःला सावरले. भिंतीकडे सरकत सरकत म्हणाला,

" वा, इतू फार चतुर झालीस. आता प्रगती व्हायला फार वेळ लागणार नाही. "

श्यामच्या तोंडातून सिगरेट पडली. ती अर्धवट जळकी सिगरेट इतूने उचलली. श्यामकडे फेकली. बिछान्यावर झुकून श्यामने ती झेलली. " थँक्यू इतू. "

इतूने बपर्वाईने खुर्ची ढकलली. कपाळावर झेपावलेले केस मागे सारले. श्यामच्या दिशेने ती पुढे आली, तिच्या अगदी जवळ येऊन श्याम परत वळला. म्हणाला, "चिडायचं नाही. डोकं शांत ठेवून खेळ."

इतूने ऐकले नाही. ती चवताळून येत होती. आंधळ्यासारखी खुर्चीला, भिंतीला, चौरंगाला धडपडत होती, दात ओठ खात होती. तिचा चेहरा लाल झाला होता. तोंडावर घामाची नक्षी उठली होती.

श्यामला चेव चढला. इतूकडे पाहून म्हणाला, "खेळ ना, आता तर फार सुंदर दिसतेस."

इतू बिछान्याजवळ थबकली. गादीवर पडलेली पर्स तिने श्यामच्या दिशेने भिरकावली. श्यामने हुकवली. भिंतीवर आपटून ती सरळ स्टोव्हवर पडली. स्टोव्हवरची किटली उलटली. ज्वाळा भडकली. किटलीतले पाणी टेबलावर सांडले. श्याम कोपऱ्यात सरकला. गरम पाणी टेबलावरून पलीकडच्या बाजूला वहात गेले धापा टाकीत इतू भिंतीशी उभी राहिली.

"श्याम, पुरे आता. मी दमले."

इतू खूप निराधार वाटली. पदर सुटला होता आणि स्टोव्हवर झुलत होता.

"थांबू नकोस. खेळ इतू. हा बघ मी जवळ आलो. पकड." त्याने हात पुढे केला.

"नाही, आता मी थकले. शक्य नाही."

"जमेल. खेळ ना. नुसतं बसून काय करणार?"

इतूने सावकाश पावले उचलली. खुर्चीला एक गिरकी दिली. जोराजोराने घेतलेला श्वासोच्छ्वास खोलीत घुमत होता. इतू शिकस्त करीत होती श्याम हुलकावण्या देत होता. आंधळ्यासारखी इतू चाचपडत होती. श्याम हसत होता. धापा टाकीत म्हणत होता, "इतू खेळ. तू छान दिसतेस. माझं शरीर गरम होत नाही इतू. खूप दिवस झाले थंड पडलंय. इतू खेळ. मला पकड. मग जय तुझा. तू सुटली आहेस इतू. वळी पडलीय पोटावर. वय वाढतंय. वय वाढल्यावर खेळायचं नसतं. म्हातारं झाल्यावर खेळायचं नसतं. मेल्यावर खेळायचं नसतं. सगळ्या गोष्टी सहज मिळत नाहीत. सहज मिळवणं योग्यही नाही. इतके दिवस अगदी सहजा-सहजी तुला मिळत होतो मी म्हणून फार कमी किंमत केलीस माझी.

" ये, पकड इतू. तिकडं नाही. इकडं ये. अडखळू नकोस. सहजासहजी खेळ सोडू नकोस. थांबू नकोस. थांबलीस तर म्हातारी होशील. मातीची पुतळी. फिरत ये. फिरता फिरता छाया बनून ये. मायाविनी हो, दुष्प्राप्य हो. जणू काही भिकाऱ्यासारखा मी तुझी याचना करतोय. जणू काही तुझ्यासाठी मी गुडघे टेकून बसलोय. तुझ्यासाठी वेडा झालोय. "

" इतू, इतु तू स्टोव्हच्या फार जवळ गेलीस. तुझे पाय लटपटताहेत. ज्वाळांवर तुझा पदर झोके खातोय.

" ओः, इतू. "

श्याम हताश होऊन पहात होता. क्षणात इतूचा पदर स्टोव्हवर पडला. ज्वाळा भडकल्या.

" श्याम ! " धापा टाकीत इतू किंचाळली.

पदर बाजूला घेऊन ती श्यामच्या दिशेने धावू लागली.

" खेळाचे नियम मोडत नाही मी, इतू. "

" काय करू श्याम ?"

बिछान्यावरचे ब्लँकेट इतूच्या अंगावर टाकून श्याम म्हणाला, " ह्यानं विझव. "

इतूने ब्लँकेट पदरावर टाकले. आग विझली. श्याम दुरूनच पहात होता. तिने पदर दूर धरला होता.

शून्य मनाने इतूने हळूहळू पदर उचलला. अजूनही तिचे हृदय धडधडत होते. धपापत ती बिछान्यावर बसली.

तिची पर्स श्यामने बिछान्यावर टाकली. इतू चमकून उठली. पर्स घेऊन दाराशी गेली, थबकून म्हणाली, " बिछाना उन्हात टाक. "

" बरं. "

" खूप दिवसांत तू दाढी केली नाहीस. "

" हूं. "

" तू खूप अशक्त झालाहेस !"

" हूं. "

" मी येते. "

" अच्छा. "

छोटा पॅसेज ओलांडून इतू जिन्याकडे निघाली होती. पाठीवरच्या पदराकडे लक्ष गेले तसे श्यामला आवेगाने वाटले इतूला बोलवावे आणि म्हणावे, " साडी उलटी करून नेस आणि मग जा. "

'पण इतू अशीच सुंदर दिसत आहे.' त्याच्या मनात आले.

( ३ )

" आपण खेळाडू आहात ?"

" हो. "

" कोणते खेळ खेळता ?"

" गोटया आणि कॅरम. "

समोरच्या माणसाने टेबलावरच्या कागदांवर नजर फिरवली. चष्मा सारखा करीत तो म्हणाला, " इथं लिहिलंय क्रिकेट आणि फूटबॉल. "

" मग आपण विचारलंत कसं ?"

तो गृहस्थ चाट पडला. श्यामकडे पाहून म्हणाला, " बसा. " दाढीवरून हात फिरवीत श्याम बसला. खूप दिवसांनी दाढीला रेझर लागला होता. त्याच्या गालाला, गळ्याला भयंकर खाज सुटली होती. दाढीचे खुंट लसलसत होते.

सेक्रेटरीएटमधल्या लांबरुंद टेबलाभोवती तिघांच्या समोर श्याम बसला होता. त्या तिघांपैकी एक श्यामच्या बरोबर समोर बसला होता. दोघे त्याच्या दोन बाजूंला बसले होते. श्याम फक्त समोर पहात होता.

पुढचा प्रश्न आला. " कव्हर पॉइन्टवरून अँगल किंवा आकृती न पाहता ड्रॉईंग ओळखू शकतोस का ?

श्यामने टेबलाखाली पाय मागेपुढे हालवले. मग निर्विकार चेहऱ्याने म्हणाला "लक्षात नाही."

पुढचा प्रश्न विचारायच्या आतच श्याम म्हणाला, "मी सिव्हिल ड्राफ्टस्मन आहे. खेळासंबंधी प्रश्न विचारून आपण काय करणार?"

तिघांनीही श्यामकडे पाहिले. खुर्चीच्यामागे रेलून तोंडावर पेन्सिल आडवी धरून चिंताग्रस्त चेहऱ्याने बसून राहिले. बाजूने प्रश्न आला,

"डीन रस्क कोण आहे?"

श्यामने पाहिले. माणूस स्थूल होता. चेहऱ्यावर छद्मी हास्य होते.

थंड डोक्याने श्याम उत्तरला, "मी रिपोर्टर नाही. माझे ड्रॉइंग पाहा." ड्रॉइंगचे कागद त्याने टेबलावर पसरले.

त्यांच्यातला एकजण हसला. म्हणाला, "आम्हांला स्मार्ट माणूस हवा. केवळ ड्राफ्टस्मन नको. तुमच्या अर्जात लिहिलंय, तुम्ही अॅडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर होता. फक्त ड्राफ्टस्मन नाही. उत्तर द्या."

श्याम गोंधळला. काय बोलावे ते त्याला सुचेना. तरीही डोके थंड ठेवून म्हणाला "डीन रस्क एकूण तीन आहेत. आपण कुठल्या डीन रस्कबद्दल विचारता?"

"बाकी दोघे जण कोण?" विचित्र नजरेने त्याच्याकडे पाहून त्यांनी विचारले.

"एक न्यूझीलंडचा हॉलिबॉल प्लेयर. दुसरा ऑस्ट्रेलियन केमिस्ट." श्यामने ठोकून दिले.

"तिसरा कोण?"

श्याम अस्वस्थ झाला. पडलेल्या स्वरात म्हणाला, "मला माहीत नाही, पण इम्पॉर्टन्ट नसावा."

"तुम्हीच तर म्हणालात तीन डीन रस्क आहेत. म्हणजे आणखी एक तुम्हांला नक्कीच माहिती असणार. पण तुम्हांला माहीत नाही."

"नाही." श्यामने मान हालवली. "डीन रस्क नावाचा कोणी आहे की नाही हेच मुळात मला माहीत नाही. इटस् म्युच्युअल इग्नोरन्स शुअर".

डीन रस्क ही व्यक्तीच श्यामला माहीत नव्हती तेव्हा त्याने सांगूनटा कले. "अशा नावाची व्यक्तीच आहे की नाही मला माहीत नाही."

कोणी काही बोलेना. तिघेही स्तब्ध झाले होते. श्याम आळीपाळीने एकेकांकडे पहात होता. मनाशी अंदाज बांधीत होता. डाव्या बाजूचा, काळा, हाडकुळा मद्रासी नक्कीच सेकंडक्लास ऑफिसर असेल. तो काहीच बोलत नव्हता. केवळ साहेबांच्या 'हो 'ला ' हो ' करीत होता. दुसरा समोर बसलेला तडक्या बंगाली अस्वस्थ दिसत होता श्यामसारखाच.

उजव्या हाताला बसलेला प्रौढ माणूस सर्वांमध्ये शांत वाटत होता. त्याच्या चेहऱ्यावरची रेषासुद्धा हालत नव्हती. कोणत्या प्रांतातला होता कोण जाणे !

श्यामला जांभई येत होती. शरीर शिथिल झाले होते. त्याला कल्पना होती. ह्यांना माणसं हवीत कशी ? कुत्र्यासारखी सावध. ससासारखी अॅलर्ट.

तरीही तो खुर्चीवरून उठला नाही. डोके हालवून त्याने जांभई घालवली. डोळे चोळले.

"आपण जाऊ शकता." समोर बसलेला माणूस श्यामकडे पाहून म्हणाला.

श्याम दाराकडे निघाला. चालता चालता मध्येच थांबला. दार उजवीकडे सरकत होते. त्या बाजूला जायचा त्याने प्रयत्न केला. त्याचे प्रयत्न निष्फळ होते. गोलगोल फिरून दार आता डावीकडे जायला लागले होते. चेटूक ? तो उभाच राहिला. त्याच्या अंगावर काटा आला होता. डोळे मिटून काही पावले तो तसाच चालत गेला. डोळे उघडतो तर तो इंटरव्ह्यूच्या टेबलासमोर उभा होता. तेच तिघे प्रश्नार्थक दृष्टीने त्याच्याकडे पहात होते. श्याम वरमला.

तिघांकडेही पाहून म्हणाला, "माझी ड्रॉईंग्ज आपण पाहिलीत ? नोकरी मिळेल मला ?" बोलता बोलता मागे मागे सरकला.

समोर आणि डावीकडे बसलेले दोघे काही बोलले नाहीत. उजवीकडच्या त्या प्रौढाने हळूहळू मान हालवली आणि धीम्या स्वरात म्हणाला, "सायकॉलॉजिकली यू आर अन्‌फिट् फॉर द जॉब."

श्याम दाराकडे गेला. दाराच्या मुठीला हाताने पकडून त्या प्रौढाकडे पाहून म्हणाला, "तुम्हीच सर्वांमध्ये अनुभवी आहात. माझ्या हातात असतं तर मीच तुम्हांला आमच्या कंपनीत नेलं असतं."

त्याने रुमालाने चेहरा पुसला. खोलीतून बाहेर आला. पुढच्या व्हराण्ड्यात उभा

राहिला. शिडी उतरून खाली आला. पाय स्थिरावले होते. लटपटत नव्हते. खरे तर नोकरी मिळाली नाही ह्याचाच त्याला दिलासा वाटत होता.

'आपल्याला आता काहीच करायचं नाही.' तो स्वत:शी समजून चुकला होता.

## (४)

तेवीस डिसेंबरला श्याम ३१ वर्षांचा झाला. सकाळी जाग येता येताच त्याला आठवले, 'आज आपला वाढदिवस'. तरीही श्याम बिछान्यातून बाहेर आला नाही. डोळ्यात अजून झोप येत होती. डोक्यावर ब्लँकेट घेऊन पुटपुटत होता 'आज आपला वाढदिवस'.

इतकी वर्षे कधीही त्याने वाढदिवसाचे कौतुक केले नाही. त्याचे म्हणणे होते, वय वाढणे म्हणजे प्रत्येक गोष्टीत शिथिलता येणे, स्पीड कमी होणे. जिना चढा किंवा उतरा, लिफ्टचा दरवाजा उघडण्यासाठी किंवा बंद करण्यासाठी हात पुढे करा, बुटाची लेस बांधायला किंवा सोडायला लागा, कोणतीही क्रिया करताना स्पीड मंदावणार. दाढी करायला घ्या, नुसते खुंट राठ झालेसे वाटणार.

ह्या क्षणी वाढदिवसाचा विचार मनात आला तसे त्याचे हातपाय गळून गेले. मन मरगळले. त्याला जांभया येऊ लागल्या. काय करायचाय वाढदिवस करून? शेवटपर्यंत तर कोणीच राहणार नाही. वाढदिवस करायचा त्याला कधीच उत्साह नव्हता. तेवीस डिसेंबरची त्याला कधी आठवणही नसे.

आज श्याम रोजच्यापेक्षा अधिक वेळपर्यंत झोपून राहिला. उशिरा उठून त्याने हातपाय धुतले. आरशात डोकावला तसे त्याला वाटले, आज आपण साधुसंतां-सारखे दिसायला लागलोत. केस वाढलेत. मानेवरचे कुरळे केस पिकायला लागलेत. आरसा घेऊन तो खिडकीजवळ उभा राहिला. खिडकीत सूर्याचे किरण आले होते. समोरच्या आंब्याच्या झाडावर पानांच्या छायेत कोळ्याचे जाळे होते. शिशिरातले दव त्यात अडकून चमकत होते.

हातातल्या आरशातले किरण परावर्तित होऊन त्या दवाच्या थेंबात पडताच

श्यामने आरसा फिरवला. समोरच्या घराच्या खिडकीत किरण पडले. ऑइलपेंटच्या भिंतीवर प्रकाश चमकत होता. एक म्हातारा ओठातल्या ओठात हसला. "ब्लॅक-मार्केटवाला" श्याम पुटपुटला.

त्याने आरसा फिरवला. गॅरेजच्या लाल दरवाज्यासमोर एक कचऱ्याची पेटी होती. त्याच्या आसपास तीन कुत्री हुंगीत होती. श्यामने त्यांच्यावर किरण टाकले. रस्त्यावर खूप प्रकाश होता. किरणांचा हवा तो परिणाम झाला नाही.

निरखून निरखून तो सावली शोधू लागला. लहानपणी श्याम हा खेळ खूप खेळला होता. आता वय वाढले. आज एकतिशी ओलांडून तो चालला होता.

तो बाहेर डोकावला. डावीकडून एक रिक्षा येत होती. रिक्षात एक पोरगी बसली होती. हातात गिटार होते. सावधपणे श्यामने आरसा सांभाळला. कोणी सांगावे, किरण पडले तर रिक्षा थांबवून पोरगी वर यायची. जाब विचारायची. श्यामने त्या पोरीला सोडून दिले. खूप दूरवर ती सरळ चालत गेली.

श्री. दत्तांच्या घराच्या भिंतीवर समोरच्या लॉनवर अनेक वेळा त्याने प्रकाशाचा खेळ केला. लॉनवर कावळा फिरत होता. शिडीच्या खालच्या पायरीखालून एक कुत्रा आला. त्याच्या तोंडावर श्यामने प्रकाश टाकला. कुत्र्याने उपेक्षा केल्यासारखे पाहिले आणि दारात डोकावून तो निघून गेला. झोत पडताच कावळाही उडून गेला.

लॉनच्या दुसऱ्या बाजूला एका घराच्या खिडकीत काही पेरू ठेवलेले होते त्यांवर किरण पडले. श्यामला आता ती कला चांगली आत्मसात झाली होती. मित्राचा म्हातारा बाप बाजार करून येत होता. मागे नोकर. दोघांनाही श्यामने सोडून दिले. एक टॅक्सी वेगात चालली होती. खिडकीत एका मुलाचा चेहरा दिसला. बंगाली नसावा. श्यामने पटकन् झोत टाकला. क्षणभर प्रकाश स्थिर राहिला. मुलाने त्याच्याकडे पाहिले. जीभ वेडावून दाखवीपर्यंत टॅक्सी निघून गेली.

तोच खेळ खेळण्यात श्यामला आता गंमत वाटेना. एका गायीवर, सिनेमाच्या पोस्टरवरील नायिकेच्या चेहऱ्यावर तो परत परत आरसा वळवीत होता.

आरसा ठेवण्यासाठी तो आत वळणार तोच मोटरसायकलचा आवाज आला. उजव्या बाजूच्या वळणाकडून येत होती. आवाज ऐकला आणि श्यामच्या हातापायांत बळ चढले. फार दिवसांपासून त्याचा त्या मोटरसायकलवाल्यावर राग होता. तो झटकन् खिडकीशी आला. मोटरसायकल वळणावरून वळत होती. रस्त्यावरून एक ढोर पलीकडे जात होते. वळणावर मोटारसायकलीचे चाक आणि त्याचा चेहरा

दिसताच श्यामने झोत टाकला. बरोबर त्याच्या चेहऱ्यावर. मोटरसायकल थांबली. त्याने श्यामच्या खिडकीकडे पाहिले. ढोराने जोरात उडी मारली. श्याम बाजूला झाला. टेबलापाशी येऊन बसला. रस्त्यावरून झणझणित शिव्या त्याच्या कानांवर आल्या. त्याने उशीखाली आरसा सरकवला. कुलूप लावून तो बाहेर पडला.

रस्त्यावर आला. लोक घाईघाईने चालले होते. सुंदर ऊन पडले होते. थंडीही होती. आडगल्लीतले एक हॉटेल श्यामने शोधून काढले. कोपऱ्यात रिकामी जागा पाहून बसला.

मनाशी विचार करू लागला, मोटरसायकलवाल्यावर आपला राग का ? कारण कळेना. त्याने समोर पडलेले वर्तमानपत्र उचलले. खूप दिवसांत पेपर वाचला नव्हता. पहिलेच पान उघडले. 'क्रीडाजगत्' '९८ रन्स काढून आउट,' 'बिच्चारा' रात्रभर झोप आली नसेल. दोन भयंकर रन्स, केवळ चाळीस गज जागा. त्यासाठी रात्रभर झोप नाही. अन्न जाणार नाही. पत्नीशी अबोला. सगळ्या गोष्टी संभवतात. अरेरे ! बिचारा ! दोन रन्स कमी पडल्या.

अगतिकतेने श्यामने इकडेतिकडे पाहिले. दैवापुढे कोणाचे काही चालत नाही त्याला अस्वस्थ वाटू लागले. पेपर दूर सारून तो उठला. पैसे चुकते केले. रस्त्यावर आला. थंडगार वाऱ्यात अन् स्वच्छ सूर्यप्रकाशात उभा राहिला. ह्या रस्त्यावरून त्या रस्त्यावर नुसता हिंडत राहिला.

दुपारी हॉटेलात त्याने स्वतःलाच पार्टी दिली. मटण, दही. कडाकडा नळ्या फोडल्या. सुबोध सकाळीच नाश्ता करून ऑफिसात गेला असेल. दिसला नाही. आज रात्री त्याला पार्टी द्यायची. आपल्या वाढदिवसाची.

जेवणावर त्याने एक पान खाल्ले. एक कॉस्टली सिगरेट पाकीट विकत घेतले. भिकाऱ्यांना वाटण्यासाठी आठ आण्यांचे सुट्टे पैसे घेतले. महिन्याचा शेवट होता. पण श्यामला काळजी नव्हती. आता बँकेत अडीच हजारापर्यंत होते. इच्छा झाली तर महिन्याच्या कुठल्याही दिवशी तो महिन्याच्या सुरवातीसारखाच खर्च करू शकत होता.

आज एकतिसावा वाढदिवस. आपण कोणाच्या स्वाधीन नाही. मनासारखा साजरा करता येईल. आजचा दिवस मजेत घालवायचा. भविष्याची चिंता करायची नाही. भविष्याची चिंता आली की सगळ्या आनंदावर विरजण पडते. सकाळची घटना विसरायची, संध्याकाळची काळजी करायची नाही. दुपारी सूर्याचे मस्त ऊन

पडले आहे. उत्तरेचा थंडगार वारा वाहत आहे. आत्ता तरी आनंद ह्यातच साठवला आहे.

ख्रिसमस जवळ आला आहे. दुकानांवर लाल पाट्यांवर सोनेरी अक्षरे झळकत आहेत. 'HAPPY CHRISTMAS'. सजवलेल्या केकने आणि म्हाताऱ्या सान्ताक्लॉजने शो-केसेस नटल्या आहेत. टेबलांवरून छतापर्यंत पावाच्या थप्प्या लागल्या आहेत.

श्यामच्या मनात आले, 'सुबत्ता आलीय. शेतात खूप पीक पिकलंय. शेतकऱ्यांच्या बायका गर्भवती आहेत. गावागावांत सरकारची दवंडी गेलीय. 'सन्तान निर्माण करा. पुत्रवती व्हा. पृथ्वीला पतित करू नका. सद्‌गुणी संतान प्रसवा. कारखान्यात उत्पादन वाढलंय. शेतात पीक अमाप आलंय. खाणीतून खनिजं बाहेर येताहेत. ह्या सर्वांचा उपभोग घ्यायला लोक कुठं आहेत ? खायला लोक नसतील तर सगळे समुद्रात जाईल. वासरांनी पिऊन उरलेलं दूध प्यायला कोणी नसेल तर दूध मातीत वाया जाईल. अमाप पिकलेल्या शेतांत आम्ही म्हशींचे कळप सोडून दिलेत. पोळ्यांतून गळून मध वाया जातोय. आयाबायांनो, पुत्रवती व्हा. देश सुफल करा. सुलक्षणी संतान द्या.'

थंडीला उबदार करणारी किरणे, चेहऱ्यावर हास्य, श्याम रस्त्यातून चालला होता. भूतकाळाचा आठव नव्हता. भविष्याची चिंता नव्हती. तृप्त वाटत होते. स्नेहमय वाटत होते.

पोस्टाच्या पेटीमागून एक भिकारी फूटपाथवर आला. त्याला ओलांडून श्याम पुढे गेला. त्याला उद्देशून कोणी विचारीत होता: "गंजी घेणार ?"

श्याम त्याच्या अंगावरून गेला. वळणावर वळला. रस्ता मोकळा होता. ओढलेल्या चेहऱ्याने एकजण हातगाडी रेटीत होता. श्यामने डोळे विस्फारून चहूकडे पाहिले. दुकानेच दुकाने. निर्व्याज चेहऱ्याने जणू रस्त्याकडेच पहात होती. सुंदर, शालीन स्त्रिया रस्त्यावरून फिरत होत्या. गुटगुटित मुले पळत होती. विनयशील तरुण नोकरीवर चालले होते. घराच्या गॅलरीतून, खिडक्यांमधून वृद्ध रस्त्याकडे पहात होते. आयुष्यातला सुंदर काळ व्यतीत करीत होते.

सगळीकडे अमूर्त जाहिराती झळकत होत्या. "थांबा, खरेदी करा. आपलं आयुष्य आम्ही मौल्यवान समजतो."

फदकन् त्याचा पाय पाण्यात बुडला. रस्त्याच्या कडेने गुडघ्यापर्यंत पाणी साचले होते. आणि त्याच्या पोटात भुकेने कळवळून आले. तरीसुद्धा घरी जायची इच्छा होईना. तो मोठ्या रस्त्यावर आला. नौरंगीच्या दिशेने ख्रिसमसचा झगमगाट दिसत होता.

निरनिराळ्या वयाचे भिकारी बसस्टॉपवर घोंगावत होते. नाकावर रुमाल धरून एक बाई बसस्टॉपकडे येत होती. टेरिलीन शर्टवाली दोन मुले बससाठी उभी होती, बस आली. चढणाऱ्या, उतरणाऱ्यांची गर्दी उडाली, धक्काबुक्की झाली. त्यातच श्याम वर चढला. दांडीला हात धरून दुसऱ्या हाताने त्याने खिशातली मोड काढली. भिकाऱ्यांच्या दिशेने रस्त्यावर फेकली. क्षणभर पैशांचा खणखणाट झाला. इतर सगळे आवाज त्या आवाजाखाली दबून गेले. सगळे दचकले. हसू दाबून श्याम सर्वांच्या चेहऱ्यांकडे पाहू लागला. फूटबोर्डवरचा म्हातारा आपले खिसे चाचपीत म्हणाला, "पैसे, पैसे पडले कोणाचे तरी."

निश्चित मनाने श्याम आत चढला. कंडक्टरने बेल दिली. श्यामने मागे वळून पाहिले. स्टॉपवर भिकाऱ्यांचा गिल्ला उडाला होता. झोंबाझोंब्या सुरू झाल्या होत्या. एकच गर्दी उडाली होती. श्यामने तोंड फिरवले.

एलगिन रोडवर त्याला बसायला जागा मिळाली. तिकीट काढण्यासाठी त्याने खिशात हात घातला. एकही सुटा पैसा नव्हता. तो भांबावला. शर्टच्या खिशात दहाच्या दोन नोटा होत्या. एक त्याने कंडक्टरसमोर धरली.

कंडक्टरचा चेहरा कठोर झाला. चेहऱ्यावरच्या शिरा तटाटून उठल्या. तुटकपणे म्हणाला, "सुटे द्या.."

"सुटे नाहीत."

कंडक्टरने मध्येच एकाला तिकीट फाडून दिले, म्हणाला, "सुटे नाहीत?"

"नाही."

"मोड मिळणार नाही."

"मग?"

"मग काय? इथं उतरून घ्या."

बोलता बोलता कंडक्टर पुढे गेला. त्याची बडबड चालूच होती, "किती वेळा सांगितलंय, जास्त रकमेची मोड बसमध्ये मिळणार नाही."

श्यामचा चेहरा लाल झाला. अपमानाने त्याचे शरीर थरथरायला लागले. वाटले, पटकन् उठून सांगावे, 'महाशय, मिनिटापूर्वी मूठभर सुटे पैसे रस्त्यावर उधळून दिलेत.' पण तो बोलला नाही. कंडक्टरला म्हणाला, "मी उतरतो."

"आपली इच्छा."

वकिलासारखा काळा सूट घातलेला उतारवयाचा एक माणूस म्हणाला, "थांब, मी बघतो. ही माझी बॅग धर. माझ्या आतल्या खिशात मोड आहे का पहातो."

चालत्या बसमध्ये हेलकावे खात खात त्याने बंद कोटाची वरची तीन बटणे उघडली. आतल्या खिशातून एक पाकीट काढले. त्याचा तोल जाईल ह्या भीतीने श्यामने त्याला पाठीमागून आधार दिला होता. आणखी एकाने त्याच्या खांद्याला आधार दिला होता, पाकिटात पुष्कळ चिटोरी होती. वरखाली करता करता एक पडला. तो वृद्ध खाली वाकला. श्यामने त्याला धरले. मग त्या सगळ्या चिठ्या-चपाट्या--एकच्या दहा नोटा--त्याने बाजूला केल्या. श्यामच्या पुढे केल्या. श्यामने हातातली बॅग आणि दहाची नोट त्याला दिली व सुटे पैसे घेतले. तो कृतज्ञतेने हसला. परोपकार केल्याचा आनंद म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावर उमटला होता.

श्याम गर्दीतून दारात आला. कंडक्टरचा कर्कश आवाज मागून आला, "तिकिटाचं काय झालं?"

श्यामने दुर्लक्ष केले. तिकीट काढायची त्याला इच्छा होईना. त्याने बेल वाजवली. बस थांबताच परत बस सुरू व्हायची बेल वाजवून तो खाली उतरला. बस पुढे गेली. थोडा वेळ बसमध्ये चुळबूळ झाली. पण श्यामने मनावर घेतले नाही. ग्राउंडमधल्या उन्हातून तो पुढेच चालत निघाला.

चालताचालता त्याने छोटेछोटे दगड गोळा केले. दगड भिरकावीत भिरकावीत तो निघाला. कसलाच विचार त्याच्या मनात डोकावत नव्हता. फार दिवसांचा राग होता फक्त मोटरसायकलवाल्यावर.

खिशातले सिगरेटचे पाकीट काढून त्याने एक सिगरेट शिलगावली. पोटात भूकेने डोंब उसळला होता. छातीत जळजळ होती. हाताची बोटे कापत होती. गेल्या काही महिन्यांत श्याम अशक्त झाला होता. पूर्वी तो दर महिन्याच्या चार तारखेला वजन करायचा. वजनाकडे त्याचे बारीक लक्ष असायचे. हल्ली किती महिने त्याने वजन केले नव्हते. तरीसुद्धा, आपले वजन कमी झाले आहे हे त्याला जाणवत होते. चरबी झडून गेली होती.

श्याम चालतच होता. केसांना खूप दिवस तेल मिळाले नव्हते. ते रुखे रुखे केस हवेवर उडत होते. वाऱ्यामुळे डोळयांत पाणी तरळत होते. क्रिकेट खेळणाऱ्या मुलीं-मधून आपल्याच नादात तो पलीकडे कधी आला त्याला कळले नाही.

पानगळीचा मधुर वास हवेत रेंगाळत होता. तो उन्हात खूप हिंडला मन मानेल तसा.

डावीकडे, उजवीकडे, पुढे, मागे, वाटेल तसा तो भिरभिरत होता. खूप दूरपर्यंत चालत आला होता. रस्त्यावर माणसे नव्हती. अवाढव्य पसरलेल्या माळावर दिसत होते फक्त सूर्याचे किरण. कागदाच्या तुकडयांशी खेळता खेळता वारा चारी दिशांत पानगळीचा मधुर वास पसरवीत होता.

शरीरातले रक्त गरम होत चालले होते, समोरच्या झाडाच्या दिशेने तो चालला होता. मध्येच थांबला. झाड हालत होते. एकदा डावीकडे, एकदा उजवीकडे, त्याच्या-पासून दूर जात होते. श्याम गोंधळला. थोडा वेळ त्याला काही समजले नाही. डोळयांची उघडझाप करून त्याने परत परत पाहण्याचा प्रयत्न केला. झाडाभोवती फिरला. शेवटी स्वतःशी हसून तो झाडाखाली आडवा झाला.

माथ्यावर ऐसपैस पसरलेले प्रचंड आकाश झटकन् खाली लवले. डोळयांत प्रकाश घुसला. निष्फळपणे त्याने सावली पकडायचा प्रयत्न केला. त्याला माहीत होते आपल्या हातात काहीच नाही. स्वतः जागे राहणे किंवा झोपणे, कशावरच त्याची सत्ता नव्हती. कसली तरी भयंकर शक्ती त्याच्या इच्छेप्रमाणे त्याला चालू देत नव्हती. काठीने टोकरून झोपेला घालवीत होती. काठीने ढोसून जणू जागे करीत होती. ह्या, ह्या सर्व आसमंतात कुठेतरी वावरत होती ती, कदाचित ह्याच मातीत, ह्या गवतात, ह्या सूर्यकिरणात, ह्या झाडाच्या छायेत, नाहीतर ह्या उद्दाम आकाशात !

डोके वर करून तो इकडे तिकडे पहात होता. पहाता पहाता गवताच्या बिछान्यावर त्याला झोप लागली.

मोटरसायकलच्या आवाजाने त्याची झोप मोडली. तो उठून बसला. हळूहळू मोटरसायकलचा आवाज क्षीण झाला. सर्कसमधल्या मृत्युगोलात नाहीतर मौत का कुवाँमध्ये सायकल जशी गोल गोल फिरत राहावी तसा हा आवाज त्याच्या डोक्यात घरघरत होता. सगळा मनाचा खेळ.

श्याम जागा झाला. डोक्यातली ती घरघर हळूहळू बंद होत गेली, थांबली. तशी छातीची धडधड त्याला स्पष्ट ऐकू येऊ लागली. अंधार वाढत होता. निर्मनुष्य

माळावर चढूकडून खाली उतरत होता. धुके पडायला लागले होते. श्याम तसाच राहिला. मनात आले, रात्रीची परी उडत उडत त्याच्या जवळ आली होती, गवताच्या बिछान्यावर त्याला झोपवून गेली होती. बरोबर नेली होती त्याची स्वप्ने, स्मृती, भविष्याची काळजी, त्याला आठवेना त्याचे नाव, पटेना त्याची ओळख !

दवाने धोतर ओले झाले होते. उत्तरेकडच्या वाऱ्याने अंग शिरशिरत होते. लक्षात आले, डाव्या हातात अजून दहांची मोड आहे. बसचे भाडे दिले नाही. आज आपला एकतिसावा वाढदिवस !

श्याम उठला. अंधार भरला माळ हळूहळू पार केला. गवत थंड लागत होते. थंडीतली गार पाने पायाशी किलकिल करीत होती. थंडी दाटून येत होती. रस्त्यावर येऊन त्याने बस धरली. रस्त्यावर त्याला एकाही प्रश्नाचे उत्तर मिळाले नाही. मोकळ्या मैदानात आपण का झोपलो ? बसचे भाडे का दिले नाही ? सुटे पैसे रस्त्यावर का उधळले ? मोटरसायकलवाल्यावर आरशातून किरणांचा झोत का टाकला ?

( ५ )

हॉटेलच्या दारात सुबोध मित्र दिसला. हॅलो, हॅलो, म्हणत तो त्याच्याकडे आला. म्हणाला, "आज साडेसात वाजताच इथं ? मी संध्याकाळचा चहा घेतलाय. तीन कप. आता रात्री दहाला जेवायला येणार."

"चल." सुबोधने श्यामचा हात धरला. "आत्ताच रात्रीचं जेवण जेवलास तर मध्यरात्री भूक लागेल."

श्यामची हुडहुडी थोडी कमी झाली होती.

त्याच्या मनात आले. आजचा संपूर्ण दिवस आपण किती थोडे बोललो. सकाळ-पासून फक्त चार जणांबरोबर. प्रथम चहा आणणाऱ्या पोऱ्याबरोबर हॉटेलात. दुसऱ्यांदा जेवायच्या वेळी हॉटेलच्या पोऱ्याबरोबरच. 'मटण आणि दही आण' म्हणून सांगायला. तिसरा पानाचा दुकानदार. त्याच्याकडे पान आणि सिगरेट.

मागितली. नंतर कंडक्टरबरोबर "सुटे पैसे नाहीत. मी उतरून जातो." बस् एवढंच.

"कुठं नेतोय ?" त्याने सुबोधला विचारले.

"मी जवळच राहतो. चल."

श्याम एखाद्या अनुयायासारखा त्याच्यामागे गेला. त्या वेळी आपल्याशी जो सहानुभूतीने बोलेल त्याच्याबद्दल आस्था वाटते.

सुबोधला तो जवळून पहात होता. बाजूने पहात होता. त्याला वाटले, सुबोधचे वय फार नसावे.

वाटेत सुबोधने लॉण्ड्रीतले कपडे घेतले. नंतर किराणा दुकानात शिरला. तिथून बत्तासे घेतले. फुलाच्या दुकानात, केळीच्या पानात बांधून हार घेतला.

एकीकडे श्यामशी बोलणे चालू होते. "तू गुन्हेगार आहेस. मी समजत होतो तू बेकार आहेस. आज हॉटेलच्या मॅनेजरने सांगितले, ऑफिसर होतास. डायरेक्टरची बदमाषी सहन न होऊन नोकरी सोडून दिलीस. खरं आहे का ?"

श्याम हसला.

"तर महाराज, हे असले आदर्श बिदर्श घेऊन चालत नसतं. ह्या आदर्शांच्या नादानं आमचं हे असं झालं. राजयोग, लाईफ डिव्हाइन हा माझा नित्य पाठ झाला. गीता तोंडपाठ होती. काही काळ साधनमार्ग धरला. ध्यान करायला बसायचो, समोर दिवा अन् उदबत्ती पेटवायची. शरीर हलकं वाटायचं. वीस वर्षांचं वय असेल, हातात दंड घेऊन फिरायचो. छातीवर हाताची घडी घेऊन विवेकानंदांसारखा उभा राहायचो, आपल्याशीच बडबडायचो, "माय डियर ब्रदर्स अॅण्ड सिस्टर्स." ' हाः हाः ! वीसएकवीस वर्षांचा होतो तरी रस्त्यावर, घाटावर, घरीं, सिनेमात, कॅलेंडरवर, पोस्टरवर, स्वप्नात, स्मृतीत तरुण पोरी दिसायच्या नाहीत. अन् आता कुठून एवढ्या पोरी उपटल्यात कोण जाणे. पोरींनी सगळा देश भरून गेलाय." तो सगळीकडे पहात होता. त्याचे दोन्ही हात सामानाने जखडले होते. डाव्या बगलेत लॉण्ड्रीचे कपडे, हातात बत्ताश्यांचा पुडा. उजव्या हातात केळीच्या पानात दुमडलेली फुले.

आता सुबोधच्या नाकाला नाहीतर मानेला खाज आली तर आपल्यालाच सांगणार, श्यामच्या मनात आले, त्याबरोबर तो म्हणाला, "फुलांचा पुडा माझ्या हातात दे."

" छे, छे, माझं रोजचंच काम आहे. आईच्या फोटोजवळ देवाचा फोटो सिंहासनावर ठेवलाय. मरायच्या वेळी सांगून गेलीय, 'देवाला रोज फुलं वाहात जा. बत्तासे ठेव.' तिनं सांगितल्याप्रमाणं रोज करतो. चारसहा आणे लागतात. नाहीतर देवावर माझा विश्वास नाही."

" परमेश्वर आहे ह्यावर तुझा विश्वास आहे ?" त्याने उत्सुकतेने श्यामकडे पाहिले. मग आपणच म्हणाला, " कधीकधी वाटतं, आहे म्हणून, परंतु. . . . . . ."

बोलता बोलता घराशी आलो. कुलूप उघडून आत जाताच सुबोधने दिवा लावला. " हे आमचं घर."

भिंतीवर अनेक देवदेवतांचे फोटो टांगलेले होते. खोलीत तीन कॅलेंडर्स होती. एक आरामखुर्ची, टेबल, इकडे तिकडे पुस्तके विखरून पडली होती. ज्योतिर्विद्येवरची दोन मासिके बिछान्यावर पडली होती.

टेबलावरच्या रवींद्रनाथ ठाकुरांच्या फोटोला हार घातलेला होता. समोर ऊदबत्तीचा स्टँड होता. सर्व वस्तूंवर धूळ साचली होती. एकच खिडकी होती. आतल्या बाजूला एक दरवाजा होता.

शर्टची बटणे काढता काढता उजव्या हाताने त्याने दरवाजाची कडी काढली. " आतली खोली पाहणार ?"

" राहू दे."

सुबोधने निश्वास सोडला. " किचन आहे. एक स्टोअररूम आहे."

त्याने कपडे बदलले. लुंगी नेसला. आत जाऊन हात पाय धुतले. श्यामच्यासमोर येऊन उभा राहिला. श्यामला खूण केली. टेबलाखाली पहाण्यासाठी. टेबलाखाली एक छोटा चौरंग होता. चौरंगावर अनेक मूर्ती मांडलेल्या होत्या. पितळेचा कृष्ण, कालीमातेची मातीची मूर्ती, रामकृष्ण, शारदामाईची तसबीर, एका बाजूला स्वतंत्र, पितळेचं शिवलिंग. छोट्या थाळीत सुबोधने बत्तासे ठेवले. एका ग्लासात पाणी आणून ठेवून दिले. सर्व मूर्तींवर फुले वाहिली. डोळे मिटून थोडा वेळ बसून राहिला.

" कोणता मंत्र बोललास ?" सुबोधने डोळे उघडताच श्यामने विचारले.

" देवा, खा. आई हाच मंत्र म्हणण्याची. काही विशेष नाही. केवळ सवय. नैवेद्य दाखवलेला असला तरी विसरायची. पुन्हा बत्तासे ठेवायची. बिछान्यावर पडल्या पडल्या म्हणायची, 'देवा खा.' देव काय खायचा ते तिचं तिलाच माहीत.

मी प्रसादाचे बत्तासे एका डब्यात घालून ठेवले. संध्याकाळी चुरमुऱ्यांबरोबर खायला होतात. हाः ! हाः !"

रवीन्द्रनाथ ठाकुरांच्या फोटोसमोर सुबोधने ऊदबत्ती ठेवली. फोटोची माळ ताजी दिसत होती. सकाळीच विकत घेतलेली. श्यामने विचारले, "फोटोला हार का घातलास ?"

केवळ सवय म्हणून घातलाय, असे उत्तर आले नाही. सुबोध थोडा लाजला. चाचरत म्हणाला, "देवदेवतांवर माझा विश्वास नाही. मी तुला मघा सांगितलं. परंतु कुठंतरी श्रद्धा असावी लागते. 'रवि ठाकूर' हा आपला 'वीक पॉईन्ट' आहे. समजलं ना ?"

"का ?"

"रवीन्द्रनाथांवर माझी खूप भक्ती आहे. श्रद्धा आहे."

"खूप जणांची असते."

"माझी तशी नाही. रवीन्द्रजयंतीला मी कुठंच जात नाही. शांतिनिकेतन पाहिलं नाही. 'जोडासंको' कुठं आहे माहीत नाही. रवींद्रनाथांच्या कवितासुद्धा जास्त वाचलेल्या नाहीत. केवळ पाठच पुस्तकात आल्या तेवढ्याच. एकदोन कुठंतरी इकडं तिकडं. एकही कविता संपूर्ण पाठ नाही. एखाददोन ओळी येत असतील, उदा. 'रमणीर मन सहस्र वर्षेरि सखा साधनार धन' किंवा 'ओ गो, वधू सुंदरी.'"

बोलता बोलता तो मध्येच श्यामला म्हणाला, "नाही नाही, तू ज्या दृष्टीनं पहातोस त्या दृष्टीनं नाही. माझ्या दृष्टीनं तो एक वेगळाच माणूस आहे. अगदी वेगळा."

श्यामला अगदी चिकटून बसत तो म्हणाला, "मी संकटात रवींद्रनाथांना हाक मारतो. अगदी लहानपणापासून. लहानपणी एकदा डोक्यावर पाल पडली. मी पळत सुटलो. बाबांच्या खोलीत शिरलो तर टेबलाला आदळलो. टेबलावर रवींद्रनाथांचा हाच फोटो होता. मी रडत रडत म्हणालो, 'रविबाबू, माझ्या डोक्यात पाल पडली. तुम्ही काढून टाका तिला.' माझ्या केसांच्या वाढलेल्या जंगलातून पटकन पाल खाली पडली. थट्टा नाही श्याम, पण त्या वेळी मला स्पष्ट दिसलं. रवींद्रनाथांच्या चेहऱ्यावर हसू होतं. हळूहळू रवींद्रनाथांबद्दल मला आईसारखी माया वाटू लागली. एकांतात माझी दुःखं मी त्यांना सांगू लागलो. तापभरल्या शरीरावरून आईनं हात फिरवला

की जे सुख मिळतं ते सुख मला मिळू लागलं. सर्वांपेक्षा माझे रवींद्रनाथ वेगळे झाले. घरी परतताना रात्र झाली की मी म्हणायचो, ' रवि ठाकूर, मला अंधाराची भीती वाटते. मला घरी पोचवा ना.' मनात यायचं, रविबाबूंनी मायेनं आपला हात धरलाय, अंधार पार करून दिलाय.

पतंग खेळायला एकदा मी कोळीवाड्यात गेलो होतो. मुलांबरोबर भांडणं झाली. ती मला खूप मारायला लागली. रडत रडत म्हणालो, ' रवि ठाकूर, ही मुलं मला मारताहेत. तुम्ही मला सोडवा. '

माझे शब्द ऐकताच मुलांनी मार थांबविला अन् हसायला लागले. म्हणाले, 'तुला रविठाकूर सोडवणार काय रे ?' तेवढ्यात मी धूम ठोकली.

खूप वेळा मी बागेत फिरायला जायचो. वाटायचं, आपल्याबरोबर रविबाबू आहेत. मेळ्यासाठी रेल्वे ब्रिजवरून जाताना वाटायचं आपल्याबरोबर रविबाबू सोबत करताहेत. नावाड्याच्या नकळत मी नौका घेऊन दुसऱ्या पाड्यात जायचो. लोकांना वाटायचं, सुबोध एकटा चाललाय. पण रविबाबू बरोबर असायचे. डोक्यावर उंच, काळी टोपी, अंगावर झब्बा, दुधासारखी पांढरी शुभ्र दाढी. प्रत्येक वेळी ही मूर्ती मला सोबत देते. मी कुठं कुठं हिंडतो. रस्ता चुकायची भीती वाटत नाही. मनात खात्री असते, रविठाकूर मला सोबत करताहेत. नेमक्या ठिकाणावर मला पोचवून देणार आहेत. मुसळधार पावसात आच्छादन घालणार आहेत, झोपायच्या आधी परीकथा सांगणार आहेत.

आई, आजी, मोठी बहीण सांगायच्या, ' भुताची भीती वाटू नये म्हणून छातीवर रामनाम लिहायचं. आस्तिक मुनींचं नाव तीनदा घेतलं तर सापाची भीती नाही.' ह्या गोष्टींवर माझा विश्वास नाही, एकांतात मी रवि ठाकुरना म्हणायचो. 'त्या लोकांना कळत नाही. तुम्ही असताना मला भय कशाचं ? आम्ही दोघंच हसायचो. सर्वांशी आम्ही दोघं लपंडाव खेळायचो.

नेहमी नाही. सर्वच काही नेहमी माझ्या मनासारखं व्हायचं नाही. फक्त सत्य, प्रामाणिक गोष्टीतच रविबाबू मला साथ द्यायचे. घातक किंवा दुष्ट इच्छा केल्या तर नाही.

एकदा माझ्या पाळलेल्या पोपटाला एका मुलानं दगड मारला. मी चिडून म्हणालो, ' रविबाबू, ह्याला आंधळं करा. '

दोन दिवसांनी माझेच डोळे आले.

आणखी एकदा मी माझ्या छोटया बहिणीशी पैज मारली. तिला म्हणालो, ' मी रात्री दहा वाजता छपरावर जाईन. '

ती म्हणाली, ' शक्य नाही. '

पैजेला पैसे लावले. मी रात्री गेलो. पण येताना कुत्र्याच्या अंगावर पाय पडला. कुत्रा चावला. त्या रात्री रविबाबू माझ्याशी बोलले नाहीत. का बोलणार ? कारण, मी छोटया बहिणीशी पैज लावली. तिचे खाऊचे पैसे मिळवण्याची इच्छा केली. बिचारीने गजरे विकत न घेता पैसे जमवले होते. ज्या वेळी माझं मन स्वच्छ असेल, भावना शुद्ध असतील त्याच वेळी रवि ठाकूर माझ्याबरोबर असतात. मुसळधार पावसात, अंधारात, नेहमी ही काळी टोपी घातलेली, झब्बा घातलेली, दुधासारखी शुभ्र दाढी असलेली मूर्ती माझ्याबरोबर असते. तुमच्या रक्तामांसाच्या रवि ठाकूरना तर मी प्रत्यक्ष पाहिलेलं नाही.

तुला असं वाटतंय, तुमचे रवि ठाकूर अन् माझ्या मनातले रवि ठाकूर एक आहेत ? ह्यांचा मेळ आहे ? "

" नाही. "

" बरोबर. "

" खरं सांगायचं तर खऱ्या रवि ठाकुरना मी मिळवलं. पण त्यांना राखू शकलो नाही. वय वाढत गेलं. स्वप्नं आली, सावधानता आली. मनात पाप जागं झालं. तेव्हा रवि ठाकुरांच्या कविता शाळेत वाचल्या. अर्थ पाहिला नाही पण समजून चुकलो, ' हे माझे रवि ठाकूर नाहीत. '

एक दिवस बागेत झाडाखाली बसलो होतो. गवताची काडी चघळीत म्हणालो, ' रविठाकूर, काहीतरी बोलाना, ' पुन्हा पुन्हा म्हणालो. शब्दही आला नाही. आला नाही तो नाहीच. रात्री झोपेतून उठून हाक मारली. गच्चीवर जाऊन हाक मारली. सकाळी उठून मैदानावर गेलो, तिथून नौकेवर चढून, आकाशाकडे पाहून, नदीच्या पाण्यात डोकावून हाका मारल्या. मग बसलो मुसमुसत, ' माझे रवि ठाकूर गेले. आयुष्यातली उत्कंठा गेली, साहस गेलं, माझं बालपण गेलं. '

सुबोधचे डोळे भरून आले. गालांवरून अश्रू ओघळले. " झोपेत आईच्या मांडीवरून मुलाला दूर सारावं, तसं माझं आयुष्य झालंय. ट्रॅजेडी. "

बोलता बोलता सुबोध उठला. अश्रू पुसले. श्याम त्याच्याजवळ सरकला. त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याने बोलायचा प्रयत्न केला. "मी समजू शकतो."

" रवि ठाकुरांशिवाय माझं कुणी नाही." अस्फुट स्वरात सुबोध बोलत होता. " माझे रवि ठाकूर मला परत कोण आणून देणार ? सांग श्याम."

श्यामने निश्वास सोडला.

" दुर्दैवाची गोष्ट तुला माहीत नाही. "

" काय ?"

" मला आणखी कुणाबद्दलच प्रेम वाटत नाही. तसं प्रेम आता मी कोणावरच कधीही करू शकत नाही. "

सुबोधला रडू अनावर झाले.

अस्वस्थ मनाने श्याम उठला. घराबाहेर पडला. रस्त्यावर आला. पाकिटातून सिगरेट काढली. काडी ओढली. 'खस्' आवाजाने त्याला आठवले, 'आज आपला एकतिसावा वाढदिवस. आपण आज सुबोधला पार्टी देणार होतो. घडलं नाही.'

रस्ता निर्जन होता. गल्लीच्या समोरून अकस्मात एक माणूस येताना दिसला. मिनू की काय ? तसाच उंच ! खूप माणसं मिनूसारखी वाटतात.

जिन्याखाली अंगाचे वेटोळे करून एक पांढरे कुत्रे झोपले होते. श्यामने त्याला काठी ढोसली. 'कँक्' करून कुत्रे उठले. जिना चढून वर गेले. भयंकर 'सूडी' दिसत होते त्याचे डोळे. श्यामने जिन्यावर पाऊल ठेवले. कुत्रे त्याच नजरेने पहात होते. श्यामला वाटले, समोरच्या जिन्यावर त्याचा प्रतिस्पर्धी असावा. पण त्याच्याच पायांचे पडसाद त्याला ऐकू येत होते. भुंकत भुंकत, कुत्रे जिना उतरून निघून गेले.

खोलीत येताच श्यामने कॉटवर अंग झोकून दिले. कितीतरी वेळ तो पडून राहिला. त्याची गात्रे गळून गेली होती.

खूप रात्रीपर्यंत तो खिडकीत उभा राहिला. वातावरणात धुके पसरले होते. झाडांच्या पानांची हालचाल नव्हती. दिव्याच्या खांबाजवळून एक कुत्रे तेवढे चालले होते.

सकाळी घेतलेल्या पाकिटातली शेवटची सिगरेट त्याने शिलगावली.

काडी ओढण्याच्या आवाजाने तो दचकला. सर्कन् कपाळावर घामाची जाळी निर्माण झाली. धुक्यामध्ये निर्जीव डोळे बुडवून तो स्वतःशीच उद्गारला, " माय गडनेस्, टुडे आय किल्ड अ मॅन."

# ( ६ )

खात्री केल्याशिवाय मृत्यूची बातमी कोण कुणाला सांगणार ? श्याम बुचकळ्यात पडला. आरशातून झोत टाकण्याचा उद्योग अनेकांनी पाहिलेला असणार.

उठताच त्याने प्रथम पेपर उघडला. मोटरसायकलस्वाराच्या मृत्यूची बातमी कुठेच नव्हती. चितपूरला एका सायकलस्वाराला टेम्पोचा धक्का लागला होता. फ्री स्कूल स्ट्रीटवर रस्ता ओलांडीत असता एक लहान मुलगा लॉरीखाली चिरडला गेला होता. पार्क स्ट्रीटच्या वळणावर एक ८० वर्षांचा म्हातारा बसमधून पडला होता. त्याचे नाव, पत्ता माहीत नव्हता. कलकत्त्याच्या कोणत्याच मोटरसायकल-स्वाराचा मृत्यू काल झाला नव्हता.

श्याम निराश झाला. मेला नसेल तर त्याचे हातपाय, कोणता तरी अवयव तुटला असेल. नाहीतर हाड मोडले असेल. हॉस्पिटलमधून बाहेर पडला की तो श्यामची खिडकी शोधून काढील. नसता उपद्व्याप केलेला. आता त्यासाठी एक दिवस त्याला एका अनोळखी माणसासमोर उभे राहावे लागेल. तो कसा असेल ? लंबाचौडा ? कठोर चेहऱ्याचा ? श्यामने त्याला पाहिले नव्हते. तोंडावर किरणांचा झोत टाकताच तो पटकन् खाली वाकला. त्याच्या तोंडावर आपण किरण का टाकले ? त्याला समजेना. तो बोलत होता, " आपल्यावर माझा राग नाही. मी आपल्याला ओळखतही नाही. पुष्कळ दिवसांपासून मला काम नाही. जमवलेले पैसे संपवतोय. हळूहळू मी मरतोय. थंड, उपेक्षित ! "

शरीर, मन गरम राखायचे असेल तर काम हवे. हातातली शक्ती क्षीण होत चाललीय. तिला वाचवण्यासाठी सारा दिवसभर मला अनेक खेळ खेळावे लागतात. माझ्या वागण्यामागे ही माझी मनःस्थिती आहे. आईवडिलांचे ऐकले असते तर आज श्याम तोच राहिला असता. केवळ टेलिफोन घेण्यासाठी जिना चढायचा, उतरायचा. त्याच्या प्रत्येक कृतीत सौंदर्य असे. मन असे. स्वतःचा जरा गंभीरपणे विचार केला असता तर आज हा खेळ का खेळला असता श्याम ?

आपला हा सगळा बचाव फुकट गेला असता. श्याम जाणून होता. त्याने ऐकले नसते. आपल्यावर हल्ला करायला तो दांडगा माणूस एकदोन पावले पुढेच सरकला असता. मग आपण सुटका कशी करून घ्यावी ह्याचा श्याम विचार करू लागला.

भिंतीत एखादा गुप्त दरवाजा, खिडकीतून उडी टाकून जाण्यासाठी एक शिडी किंवा इतूबरोबर खेळलेला शिवाशिवीचा खेळही तो खेळू शकेल. नाहीतर सुबोधला जाऊन सांगेल, " एकाच जागी फार दिवस राहणं चांगलं नाही. काहीतरी बदल हवा. माझ्या घरी येऊन राहा. "

त्याने खोलीत नजर फिरवली. फक्त एक दरवाजा होता. नंतर पॅसेज, नंतर जिना. खिडकीजवळ जाऊन पाहिले, जवळजवळ बाराचौदा फूट खाली सिमेंटचा फूटपाथ. काय करावे काही समजेना. डाव्या बाजूला भिंतीत बाथरूमकडे जाणारा दरवाजा होता. त्याला सुरक्षित वाटेना. कुठूनच पळून जाण्यासारखी जागा नव्हती. लपून राहायला जागा नव्हती. आणि तो मोटरसायकलवाला धट्टाकट्टा असेल, लंबाचौडा असेल, तर स्वतःचे रक्षण करण्यासाठी श्यामला तयार रहायला हवे होते.

विचार करता करता समोर अदृश्य असलेल्या प्रतिपक्ष्याकडून तो मार खायला लागला. ह्या दिशेला, त्या दिशेला सरकू लागला. चौरंगावरून उडी मारली. भिंतीवर धडक दिली, एकदा रूपश्री फर्निचर्सच्या शेल्फवर आदळला. जखम झाली. भिंतीचे ढेकूळ पडले. धापा टाकीत टाकीत म्हणाला, ' नाही बाबा, तुझ्यावर राग नाही माझा. कधी नव्हतामुद्धा. ' बोलता बोलता अदृश्य व्यक्तीचा हात त्याने आपल्या हातात घेतला. विचारले, ' चहा घेणार ? पलंगावर बसा तरी. ' बोलता बोलता घरातली एकमेव खुर्ची त्याने खिडकीशी आणली. ' नाहीतर ह्या खुर्चीवर बसा. म्हणजे ऊन तोंडावर येणार नाही. आराम मिळेल. तोपर्यंत मी चहा करतो. '

बोलता बोलता तो खोलीभर हिंडला. ' आपण काही खूप वाईट दिसत नाही. चेहऱ्यावर ओरखडा उठलाय. हाताला बँडेज बांधलंय तरी आपण वीर पुरुषासारखे दिसतो. युद्धावरून परतलेल्या सोल्जरसारखे. '

' आपण विवाहित आहात ? नाही. मग फारच चांगलं. ह्या अवस्थेत आपण पोरींना आकर्षून घ्याल. आमच्या देशात पोरींना वीर पुरुष आवडत नाहीत. जे पुरुष त्यांच्याकडे पाहतात, अवतीभवती हिंडतात, शाळाकॉलेजभोवती घिरट्या घालतात, येण्याजाण्याच्या रस्त्यावर खूप दूरपर्यंत पाठलाग करतात, प्रेमपत्रं लिहितात, ओळख झाल्यावर फिरायला घेऊन जातात, मैदानावर नाहीतर बागेत, ते मुलींना आवडतात. खरे वीर पुरुष त्यांना आवडत नाहीत. ते जाऊ दे. आपल्यासारखे वीर पुरुष पोरींमध्ये गुंतत नाहीत. '

टेम्पो किंवा गाडीचा धक्का आपल्याला बसला नाही. रस्त्यात नेहमी काहीतरी गोंधळ चालू असतो. एखादा विटेचा तुकडा आपल्यावर आदळला नाही, बरे झाले.

मोटरसायकलच्या दुर्घटनेतून आपली सुटका झाली ह्यात आपली वीरता दिसते

एक चित्र डोळ्यांसमोर उभे राहिले. अहंकारी, साहसी पुरुषाचे. घोड्याचा लगाम खेचावा तशा पोझमध्ये मोटरसायकलवर बसलेला. निधडी छाती, बसण्याची तीच उग्र तऱ्हा, हवेवर केस उडताहेत. ओठावर दबलेलं हसू आहे.

खोटं नाही, लहानपणापासून डोळ्यांसमोर अशा मोटरसायकलस्वाराचं चित्र मी पाहात आलोय. माझ्या आयुष्यातली ही एकमेव अँबिशन होती. मोठेपणी मोटरसायकलवाला व्हायचं. सतराअठराव्या वर्षी प्रथम कलकत्त्याला आलो. रस्त्यावर सार्जंट पाहून मुग्ध होऊन गेलो. कंबरेला धूसर रंगाचे पिस्तूल, डोक्यावर काळी टोपी आणि लाल मोटरसायकल ! सार्जंट दिसला की रस्त्यावरच्या पोरींकडेसुद्धा लक्ष जायचे नाही.

तो अदृश्य माणूस खुर्चीवरून उठला. त्याला दोन्ही हातांनी थांबवून श्याम म्हणाला, " नाही, नाही, आत्मसमर्थन करण्यासाठी मी हे सांगतोय असं कृपा करून समजू नका. आपल्यावर किरणांचा झोत टाकला हे खरं. पण, आपण समजून घ्या. काही उद्योग नव्हता. वेळ जाता जात नव्हता. सकाळपासून दिवस फार रेंगाळत चालला होता. काही घडत नव्हतं. दिवसातून दोनदा पत्रांची बॉक्स उघडली. पक्ष्याच्या घरट्यासारखी पत्रांची छोटी बॉक्स उघडताना मनात यायचं, दारातून एखादं खारकुंडीचं पिल्लू डोकावून जाईल किंवा चालता चालता हाताला एखादं गुलाबी प्रेमपत्र लागेल नाहीतर एखादी भेट !

काहीच घडत नव्हतं."

सकाळी उठता उठताच मनात आलं, आज कुणीतरी यावं. अगदी अनोळखी. त्याला पाहून वाटावं की चेहरा ओळखीचा वाटतोय पण ओळखता येऊ नये. जाताना त्यानं मागं ठेवून जावी हुरहूर. झोपताना मनात आलं, आज स्वप्नात संदेश मिळावा. कॅन्सरचं औषध नाहीतर गुप्त धन !

धुकं दाटल्या रस्त्यावरून चालताना मनात आलं, 'धुकं संपताच आपण परदेशात पोचलेले असू. तिथं पिकलेलं धान्य खायला लोक नाहीत म्हणून समुद्रात टाकून देताहेत. गायींच्या स्तनांतून दूध ठिबकतंय. पोळ्यांतून मध गळतोय. माती भिजून जातेय. दुकानदार दुकानं थाटून बसलेत, सारा देश म्हणजे पैसा झालाय. शांत, धार्मिक माणसं धीम्या पावलांनी चालताहेत. साऱ्या वर्षभर तिथं उत्सव चाललाय.

श्याम खुर्चीसमोर येऊन म्हणाला, 'काही नाही. काहीसुद्धा घडलं नाही.'

अदृश्य व्यक्तीला श्याम दारापर्यंत पोचवायला गेला. म्हणाला, 'अच्छा, भेटू या परत.'

माघारी परतला. विषण्ण मनाने तसाच उभा राहिला. काही क्षणच. लगेच त्याने वर्तमानपत्र उलगडलं. सिगरेट पेटवली, बोबडचा स्वरांत पुटपुटला, " माय गुड-नेस ! आय कुड नॉट किल् दॅट मॅन ".

सगळीकडे नजर फिरवीत म्हणाला, ' छे, इथं कुठंच लपायला जागा नाही. पळून जायलासुद्धा रस्ता नाही.'

दुपारी तीन पत्रं आली. एक विमा कंपनीकडून, प्रिमियरसाठी, ज्योतिभोवती ओंजळ असलेलं चित्र. खाली लिहिलेलं, " आपलं आयुष्य मौल्यवान आहे."

दुसरं इलेक्ट्रिकचं बिल. तिसरं, बाबांचं पत्र. पाकिस्तानात स्थायिक झालेल्या वडिलांचं पत्र. एकही पत्र श्यामने नीट वाचले नाही. वडिलांच्या पत्राकडे नुसता पहात राहिला. मधूनच एखादी अर्धी ओळ नजरेला पडायची. 'भविष्याच्या बाबतीत निराश होऊ नकोस. खचून जाऊ नकोस. इतक्या दूरवरून तुझ्या बाबतीत आम्ही आणखी काय करू शकणार? परमेश्वरावर भरंवसा ठेव. आजीची तब्येत पाहून ये. सोनाकाका आणि रंगाआत्याची विचारपूस कर. संकटात आपले नातेवाईक मित्रच मदतीला येतात. आशू गांगुलीला जाऊन भेट, तो माझा बालमित्र आहे. हावडचाला तीन लोखंडाचे कारखाने आहेत. चार मजली घर आहे. शिवाय गाडी, जमीनजुमला. दिवस फार कठीण आलेत. संधी मिळताच हिंदुस्थानात आलो नाही तर तो अविचार ठरेल. इथं गंगा नाही ह्याचं वाईट वाटतं. धनभाईचं श्राद्ध झालं. समारंभ झाला नाही. हिंदुस्थानात असल्यामुळं त्याची मुलं येऊ शकली नाहीत. जातीतल्या लोकांनी उरकलं.'

तुझ्या आईची स्थिती पूर्ववत् आहे. झोपूनच आहे. पुलिनची पत्नी येऊन स्वयंपाक-पाणी करून जाते. तुझी आई झोपेत मध्येच तुझं नाव घेते. तिथल्यापेक्षा इथं वस्तूंच्या किमती जास्त आहेत. तांदूळ महाग आहे. दोन वेळा भरपूर भात मिळाला नाही तर बंगाली लोकांचं भागणार कसं?

सांभाळून राहा. परमेश्वरावर भरंवसा ठेव. तुला संसारी झालेलं पाहिलं की निश्चित मनानं डोळे मिटतील.

दहा वर्षांपूर्वी बाबा कलकत्त्याला आले होते. श्याम आणायला गेला होता.

अनोळखी वाटले. कुबंड आलेले. चेहरा काळा, रोगट. नमस्कार करायला वाकलो तेव्हा पाठीवरून हात फिरवला. " मनू, कसा आहेस ?" स्वरात कंप होता.

जितके दिवस राहिले तितके दिवस सारखे हिंडत होते. एका जागी राहिले नाहीत. कांचीपाडा, हालिशहर, बैंचीग्राम, सोमपूर नाहीतर डायमंड हार्बर. सगळीकडे जाऊन आले. त्याला सांगितले, " आपल्या नातेवाईकांची, जातिबांधवांची विचार-पूस करीत जा. संकटात आपल्या रक्ताचा माणूस मदतीला येतो. माझ्याच्यानं परत येणं होणार नाही. यावंसं वाटत नाही. ह्या देशानं आमच्यावर वक्र दृष्टी केलीय." पाकिस्तानात जायचं की नाही ह्या बाबतीतला निर्णय बाबांनीच घेतला होता.

आईने आमरस आणि नवीन कपडे पाठवले होते. महिन्यानंतर बाबांना सीमे-पर्यंत सोडून आलो. सीमा ओलांडताना बाबा एवढंच म्हणाले, " मनू, सुखात रहा."

' आज हे पत्र आलंय. कुणाचं ? बाबांचं ? कोण बाबा ? कोणाचे ? हा माणूस कोण ? दुसऱ्या देशातला ? अनोळखी माणूस. घराची माया सोडू शकत नाही. ह्या माणसाशी त्याचा संबंध काय ?'

श्यामच्या बॅगेत आईबाबांचा एक जोड फोटो आहे. पार्श्वभूमीला राजबाडीचा सीन, जवळ फ्लॉवरपॉट, वडिलांच्या अंगावर सुती कोट, धोतर, पायात बूट. जवळच साडीतली छोटीशी आई, कॅमेऱ्याच्या लेन्ससारखे कुतूहलाने लुकलुकणारे डोळे.

' हेच आपले आईबाप ? ह्यांनीच आपल्याला जन्म दिला. ही माणसं कोण होती ? कुठून आली होती ? ' श्याम जाणत नव्हता.

हल्ली तो फोटो काढून पहात नाही. पूर्वी परीक्षेला जायच्या आधी आईच्या आठवणीने रडायचा. नवीन नोकरीवर जायच्या आधी ह्या फोटोला नमस्कार करून जायचा. आस्ते आस्ते कापराच्या गंधासारख्या आईवडिलांच्या स्मृती पुसट पुसट होत गेल्या.

कधी ' रामबोलो ' करीत रस्त्यावरून प्रेत गेले की ' कुयोतला ' ची आठवण व्हायची. घाटावर जायचा मोठा रस्ता, झाडेझुडपे आठवायची.

त्याला वाटायचे सगळीकडे अंधार पसरलाय. दशदिशा अंधारमय झाल्यात. उत्तरेकडे एक घर आहे. एक कंदील घेऊन आई तिथं बसलीय. फक्त त्या कंदिलाचा तेवढा उजेड पडला आहे. चेहऱ्यावर सुरकुत्या पडल्यात. कातडी लोंबत आहे. समोर अंधार पसरलाय. फक्त एक फिक्कट तारा आकाशात दिसत आहे. त्या भयानक

अंधकारात आईच्या सगळ्या संवेदना जणू काही बधिर झाल्या आहेत. बोलताना तिची मान हलत आहे. तरीमुद्धा गोठलेल्या स्वरात ती पुटपुटतेय, 'मनू, मनू रे मनू.....मनू.''

मनातल्या मनात श्याम विचारीत होता. "तू माझी कोण ? तुम्ही कोण आहात? मी तुम्हांला ओळखत नाही." आणि तो दचकला. चाचरत म्हणाला, "तुम्ही सुखात रहा. माझी काळजी करू नका. मी ठीक आहे. अगदी सुखात आहे मी. पहात रहा. खूप चांगले दिवस येणार आहेत. आपलं सुंदर घर होणार आहे. बाग होणार आहे. तलावात मासे सोडायचेत. उरलेल्या जागेवर जातिबांधवांना घर बांधून देऊ. एक धोब्याला, एक न्हाव्याला."

ह्या दूरवरच्या परदेशातून मी तुमच्याकडे परत येणार आहे. नौकेवर सामान लादून येणार आहे. तो सुदिन येणार आहे. लहानपणचे एक गाणे त्याला आठवले.

मायेर दिलाम डबल शाँखा
भाई कराइलाम बिया
बापेर दिलाम शोनार मटुक
तीर्थ कर गिया—

( ७ )

भर दुपारी, गडियाबाजारच्या वळणावर कारण नसता श्यामने एका माणसाचा पाठलाग केला. माणूस काळा, हाडकुळा होता. त्याचा चेहरा ओढलेला, त्रासलेला दिसत होता. डोळ्यांना गॉगल्स, टेरीकॉटची पॅण्ट आणि झगझगित क्रीम रंगाचा शर्ट, हातामध्ये फोलिओ बॅग. त्याचा झगझगित पोशाख विसंगत दिसत होता. श्यामला वाटले, चोरून आणलेले कपडे अंगावर चढवलेत.

बाटाच्या दुकानासमोर तो माणूस थांबला. शोकेस पाहिली. मग हळूहळू सिगरेटच्या दुकानाशी गेला. एक स्वस्त सिगरेटचे पाकीट खरेदी केले. कापडाच्या दुकानातल्या डमीकडे पाहून स्वतःशीच हसला.

रस्त्यावरून जाणाऱ्या एका सुंदर मुलीकडे पहात राहिला. नंतर सावकाश रस्ता ओलांडून ट्रामच्या स्टॉपच्या दिशेने गेला.

श्याम त्याच्या पाठोपाठ गेला. मनात आले, ' ह्या माणसाचं आयुष्य सरळ, साधं, नसावं.' त्याच्यावर त्याने बारीक लक्ष ठेवले. सगळीकडे खूप सावधपणे पहात होता तो ! अशा तऱ्हेचे लोकच गर्दीत लोकांची पाकिटे मारतात. नाहीतर तरुण पोरींच्या लुसलुशित छातीला स्पर्श करतात. 'हा तसलंच काहीतरी करणार,' त्याच्यावर दृष्टी ठेवून त्याच्या पाठोपाठ श्याम ट्रामच्या स्टॉपवर आला. त्या माणसाने हिरवा रुमाल काढला. तोंड, गळा पुसला. स्टॉपवरच्या मुलींकडे पाहू लागला. डोळ्यात चेहऱ्यावर दिसत होती कामभावनेची वखवख ! पण त्याने काहीच केले नाही.

ट्राम येताच तो खूप सभ्यपणाने उभा राहिला. बायकांना स्पर्श केला नाही. कोणाच्या खिशाकडे पाहिले नाही. श्याम मनात म्हणाला, "आता काहीतरी कर बाबा, तुझ्याकडून अपेक्षा करून बसलोय. भीती कशाची ? तो माणूस दिसतोय ना ? अंगावर पंजाबी स्टाइलचे धोतर नेसलाय, लक्ष देऊन पहा, चुळबुळ करतोय तो. त्याच्या खिशावर डोळा ठेव. नाहीतर ती पोरगी उभी राहिली आहे ती, दिसायला सुंदर नाही. पण कामुक दिसतेय. ओठावरून सारखी जीभ फिरवितेय. निश्चित मनाने तिच्या अंगाला स्पर्श कर. काही होणार नाही. भितोस कशाला ?"

पण तो अगदी सज्जन माणसासारखा बसला होता. खिडकीतून बाहेरची दृश्ये पहात होता. श्यामची निराशा झाली. पक्क्या बदमाशासारखा तुझा चेहरा दिसतोय. केवळ दृष्टीनंसुद्धा एखाद्या मुलीला गर्भवती करू शकशील. डोळ्यांच्या इशाऱ्यावर आमच्या खिशातलं पाकीट लांबवू शकशील. करून दाखव. ती जादू तरी पाहू दे. भीती कशाची? बक्अप् , चीरिओ!

तरीसुद्धा तो माणूस उभाच होता. त्याच्या डोळ्यात, चेहऱ्यावर अगदी कोवळे, एखाद्या कवितेसारखे भाव होते. श्यामची खूप निराशा झाली.

तरीसुद्धा श्यामने त्याचा पाठलाग सोडला नाही. ग्रँड हॉटेलच्या विरुद्ध दिशेला तो उतरला. रस्ता ओलांडून मोठ्या रस्त्यावर आला. सुरेंद्र बॅनर्जी रोडवरून निघाला. श्याम खूप अंतर ठेवून चालत होता. त्या माणसाने मान वळवली. श्यामने हसण्याचा प्रयत्न केला. त्याला समजावण्याचा प्रयत्न केला. "भिऊ नकोस. मला फक्त पहायचंय. तू काहीही करावंस असं वाटतंय. तुम्ही असली कामं करणारे लोक. काहीतरी कर. माझ्यावर विश्वास ठेव. तुला पकडणार नाही. पोलिसकडंही देणार नाही."

त्या माणसाने कपाळाला आठ्या घातल्या. तोंड फिरवून तो चालू लागला. मधून मधून मान वळवून श्यामकडे पहात होता. फ्रीस्कूल स्ट्रीटवर आल्यावर एका मोठ्या घरात शिरला.

"घाबरला." श्याम स्वतःशीच उद्‌गारला. निराश होऊन श्याम परत फिरला. एका मोकळ्या रेस्टॉरॉमध्ये शिरला. एक कप चहा आणि पाणी आणायला सांगून रिकामा बसून राहिला.

जवळच्या टेबलावरून एक सिंधी व्यापारी उठून गेला. एक थुलथुलित शरीराचा पंजाबी तिथे येऊन बसला. मोठ्या मोठ्या डोळ्यांनी तो श्यामकडेच पहात होता.

रस्त्यावर ऊन होते. ठक्ठक् करीत दोन अँग्लोइंडियन मुली रस्त्यावरून गेल्या.

काऊंटरवर पैसे देऊन श्याम बाहेर पडला. घराच्या दारात आला तेव्हा अंधार पडायला सुरवात झाली होती. त्याने दचकून पाहिले. दाराजवळच कोणी व्यक्ती उभी होती. तोच माणूस की काय ? त्याच्या चेहऱ्यावर अंधार होता. कपाळावर हात ठेवून एक पाय मागे घेऊन श्याम निरखून पाहू लागला. ती व्यक्ती एक पाऊल पुढे आली. नाही, हा तो नाही. नेव्ही ब्लू सूट घातलाय, गळ्याला बो, चेहऱ्याची ठेवण सुंदर. ती व्यक्ती श्यामच्या अगदी समोर आली. अरुण ! त्याने हात पुढे केला. अरुणचा हात हातात घेतला.

"अरुण ?"

"यस्, श्याम, तुला ओळखलं नाही."

"तू खूप सुंदर दिसतोस."

"चल, सगळी अल्कोहोलची फॅट, तू काय म्हणतोस ?"

"ठीक"

"ठीक दिसत नाहीस. दाढीबिढी वाढवून चेहऱ्याचं असं काय केलंस ?"

दोघे आत आले. श्यामच्या समोर बसत अरुण म्हणाला,

"भांडण करून नोकरी सोडून दिलीस ?"

"हूं."

"फार मोठं डॅशिंग, धैर्य दाखवलंस असं वाटतंय ? किती वर चढणार होतास आणि काय दशा करून घेतलीस ?"

श्याम गप्पच राहिला.

"साल्या, माझीही तीच अवस्था झाली होती. पण एक दिवस त्याच्या काळुंद्र्या पोरीला पळवलं. त्यांनी खूप आरडाओरडा केला. पण शेवटपर्यंत निभावून नेलं."

"एका गोष्टीचं वाईट वाटतं. आपली पत्नी सुंदर असावी अशी माझी लहानपणापासूनची इच्छा होती. ती पुरी झाली नाही. फेब्रुआरीत अमेरिकेला चाललोय. बायको तिच्या वडलांच्या घरीच राहील."

अरुण खूप उजळ दिसत होता. साहेबी पोशाख घातला होता म्हणून नव्हे, रंग गोरा होता म्हणूनही नव्हे. सगळ्या शरीरावर एक प्रकारची परदेशी छाया पडली होती. अरुण त्याला एकदम अनोळखी वाटला.

चहा पिऊन दोघे उठले.

"कुठं जाणार ?" रस्त्यात येताच अरुणने श्यामला विचारले.

"माहीत नाही."

"चल साला, त्या तुरुंगातच मरून जाशील. माझ्याबरोबर चल."

"कुठं ?"

"सुंदर जागा आहे. रिसेप्शनिस्ट पोरीच्या समोर बसशील. माझं फक्त अर्ध्या तासाचं काम आहे. व्यापारासंबंधी." अरुण डोळे मिचकावीत म्हणाला.

रस्त्यात एका बूट पॉलिशवाल्याकडून अरुणने पॉलिश करून घेतले. म्हणाला, "बुटात, तुझं तोंड दिसायला हवं." पोरगा हसून म्हणाला, "जी हाँ."

श्यामला आत आत कुठेतरी शांत, थंडगार वाटत होते. आनंद, उत्साह, काम सर्वांतून मुक्त झाल्यासारखे वाटत होते. मुक्ततेचे, विश्रांतीचे, संथ आयुष्य चालले होते. जशी काही आयुष्यात संध्याकाळ आली होती. आयुष्यात कधीही न संपणारी सुट्टी सुरू झाली होती. बाल्कनीत आरामखुर्चीत बसून तो रस्त्यावरचं दृश्य पहाणार होता. त्या दृश्यात तो कुठेच असणार नव्हता.

अरुणबरोबर झट्झट् पावले उचलताना त्याला कष्ट होत होते. धापा टाकीत म्हणाला, "अरुण जरा हळू."

खूप पुढे गेलेला अरुण थांबला.

"तू साल्या अगदी निःसत्त्व झालायस. कुठं गेला तुझा चटपटितपणा? क्विक् रिफ्लेक्स ?" हा हा करून अरुण रस्त्यातच हसला. "तू म्हातारा झालायस ?"

“ नाही. मला कुठंच जायची घाई नाही. ” तो मनात म्हणत होता, ‘ थांबलास तर तू म्हातारा, तू दुर्भागी, मातीचा पुतळा. ’

रिसेप्शनरूममध्ये श्यामला बसवून अरुण आत गेला. त्या एअरकंडिशंड रूममध्ये श्याम सोफ्यावर बसून राहिला. त्याच्याभोवती पुष्कळ जण होते. रिसेप्शन काऊंटरवर एक मुलगी होती. फोन घेण्यात आणि व्हिजिटर्सची विचारपूस करण्यात ती गढून गेली होती. अरुण सांगत होता ते खरेच होते. पोरगी खूप सुंदर होती. तिचा लांब, शुभ्र हात रिसेप्शन टेबलावर भराभर हालत होता. टेलिफोनच्या शेजारी एक वही ठेवलेली होती. गडद बैंगणी रंगाचे ब्लाऊज आणि त्याच रंगाची साडी ती नेसली होती. कापलेले केस मानेवर एका फीतने बांधले होते. गोल चेहऱ्याला कपाळावर रुळणाऱ्या बटा शोभून दिसत होत्या. तिचा बोलका चेहरा जणू सांगत होता, “ माझं वय फार झालेलं नाही. मला कोणतंच दुःख नाही. तुझा माझा परिचय नाही. ”

तिचे भिरभिरणारे डोळे आणि दोन्ही भुंडे हात टेलिफोनवरून पटापट फिरत होते. पुस्तकावरून-वहीवरून दोन्ही हात काम करीत होते. जणू पियानोवरच बोटे फिरत होती.

श्यामच्या भोवताली प्रत्येक जण कुठल्या ना कुठल्या कामात मग्न होता. हळूहळू एकेकाला आतून बोलावणे आले. जागा रिकामी झाली. एक वेळ अशी आली की तो एकटाच तिथे उरला आणि ती रिसेप्शन गर्ल ! तिच्या कामातून ती मधून मधून श्यामकडे पहायची.

लक्षात आल्यावर श्याम गडबडला. छातीत धडधड सुरू झाली. गाडीने स्टेशन सोडल्याचा आवाज हळूहळू वाढत गेला. त्याने खिशात हात घातला. सिगरेट नव्हती. काचेचा दरवाजा उघडून दोन तरुण रिसेप्शनरूममध्ये आले. काऊंटरसमोर उभे राहिले. हलक्या आवाजात काही थट्टामस्करी केली. मग काही बोलले. दोघांपैकी एकाने काहीतरी लिहिले. ते वाचताच जीभ बाहेर काढून पोरगी बंगालीत म्हणाली, “ ना, ना ! ”

पटकन् श्यामकडे दृष्टी टाकून नजर वळवली. तेवढ्यात फोन आला. सहजपणे फोन घेऊन इंग्रजीत म्हणाली, “ ओ बोस ? मिस्टर बोस ? हियर ही इज, थँक्यू. ”

परत एकदा दृष्टादृष्ट झाली. हळूहळू श्याम अस्वस्थ होऊ लागला. खूप दिवसांत त्याने आपल्याला सजवले नव्हते. हेळसांड केल्यामुळे जंगली माणसासारखे त्याचे

शरीर झाले होते. जुन्या पोथ्यांसारखी दृष्टी झिरझिरित झाली होती. खांद्यावरच्या शालीखाली त्याने आपले शरीर तपासून पाहिले. छे, श्याम तोच होता. त्याच्या मनात आले, शाल पांघरलेली, गालावर दाढी वाढलेली. आगगाडीच्या पुलावरून जाताना व्हावा तसा हृदयात धाड्धाड् आवाज होत असलेली ही व्यक्ती वेगळीच आहे. श्याम त्या व्यक्तीला ओळखीत नव्हता. ह्या पोरीसमोर आणून बसवलेला हा कोणीतरी अनोळखी माणूस होता.

'तुला काय वाटते ? बाहेरचं कडक ऊन टाळण्यासाठी, परवानगी न घेताच मी ह्या एअरकंडिशण्ड रूममध्ये येऊन बसलोय? की मी बदमाष आहे? की तू सुंदर आहेस म्हणून तुझ्यासमोर येऊन बसलोय ? मी कोणी चोरबदमाष नाही. त्या बाबतीत तू निश्चित राहा.'

मनातल्या मनात हे सर्व श्याम तिच्याशी बोलला. स्वतःच्याच मनाची परीक्षा त्याने घेतली. एखाद्या सुंदर मुलीसमोर एकट्याला घरात समोरासमोर बसायची वेळ आली तर ?

समोरच्या पेपरमधून त्याने एक पेपर घेतला. डोळ्यांसमोर धरून चित्रे पाहू लागला. सिगरेट-अजाणता त्याने खिशात हात घातला. सिगरेट संपली होती. तो विसरला होता. पेपर सरकन् खाली पडला. तेवढ्याने, त्या साध्या आवाजाने श्याम दचकला. त्याचे हातपाय थरथरले.

त्या पोरीकडे पहायचे नाही म्हणून श्याम कोशिश करीत होता. थोडा वेळ काहीच घडले नाही. कोणी व्हिजिटर्स आले नाहीत, फोनची रिंगही वाजली नाही. मोकळ्या खोलीत दोघे निस्तब्ध बसून राहिले.

टेलिफोनची रिंग वाजली. गोड स्वर ऐकू आला. पोरगी तिच्या कामात आता गढून गेली असणार. श्यामने नजर वळवली. तो दचकला. डाव्या हातात रिसीव्हर, उजव्या हातात पेन्सिल. ती एकटक त्याच्याकडेच पहात होती. नजर मिळताच पेन्सिल ठेवून तिने उजव्या हातात रिसीव्हर घेतला. पक्ष्यासारख्या मंजुळ आवाजात त्याला विचारले, "हूम डु यू वॉन्ट प्लीज ?"

श्याम सावध झाला. 'काय पाहिजे मला ? कुणाला भेटायचंय ?' त्याच्या हातापायांला सूक्ष्म कंप सुटला. क्षणात तो सर्व विसरला. त्याला काही आठवेना. 'का बसलोय आपण इथं ? का ?'

तो उभा राहिला. त्याचा गळा रुद्ध झाला होता. त्याला कोणालाच भेटायचे नव्हते. कोणासाठीही तो तिथे बसला नव्हता. इथे त्याचे काही काम नव्हते.

तो दाराच्या दिशेने निघाला. मध्येच थांबला. भीतीने त्याच्या शरीरावर शिरशिरी आली. त्याला वाटले, दरवाजा सरकतोय, डावीकडून उजवीकडे, परत डावीकडे. अद्‌भुत ! श्याम डोळे विस्फारून पाहू लागला. परत काही अंतर चालून गेला. तो काऊंटरसमोर उभा होता. कपाळाला आठ्या घालून पोरगी त्याच्याकडे पहात होती. तिला विचारायचे होते, "तू कोण ?"

"मी कोण ? स्मृतिभ्रंश झालेल्या मुलासारखे श्यामने खोलीभर पाहिले. असहायतेने त्याचे हात आधार घेण्यासाठी धडपडत होते. खुर्चीचा हात नाहीतर टेबलाचा काठ चाचपडत होते. त्याचे ओठ पुटपुटत होते, "मी कोण ?" मला माहीत नाही. पावसाच्या पाण्याप्रमाणे त्याची छाती भरून गेली. कुठल्या फांदीवर मी जन्माला आलो मला माहीत नाही.

ती खुर्चीवरून उठली. म्हणाली, "लेट मी हेल्प यू." "नाही, मला स्पर्श करू नकोस," त्याच्या अंतःकरणातून शब्द उमटले, पण तोंडातून फुटेनात. तो एक एक पाऊल मागे मागे सरकत गेला. काचेच्या दाराला त्याने हाताने धरले. पोरगी घाबरून त्याच्याकडे पहात उभी होती.

सूर्याच्या किरणांबरोबरच तो काचेच्या दारातून बाहेर आला. फूटपाथवर उभा राहून स्वतःशी म्हणाला, "मला विचारू नकोस. मी कोण ? मलाच माहीत नाही मी कोण !"

मान हलवून तो स्वतःलाच म्हणाला, छे, लपायला कुठं जागाच नाही. पळून जायला रस्ताही नाही. कुठंही गेलं तरी प्रश्न त्याची पाठ सोडणार नव्हता. "तू कोण ?"

श्यामला माहीत नव्हते. खरेच माहीत नव्हते.

"काय झालं ? बाहेर का आलास ?"

पाठीवरून हात फिरवीत अरुण विचारीत होता.

"उगाच" श्याम म्लानपणाने हसला.

"तू आत दिसला नाहीस. मी घाबरून गेलो. शेवटी त्या रिसेप्शनिस्टनं सांगितलं, तू बाहेर उभा आहेस."

ओठाच्या कोपऱ्यात स्मित खेळवून अरुण म्हणाला, " पाहिलीस ? "

" कोण ?'

अरुणने डोळे वटारले. म्हणाला, " साल्या, तू म्हणजे एक कोडं आहेस. मी मुद्दामच बाहेर यायला उशीर केला. मी तुला चांगलं जाणतो. तेव्हा तू असा नव्हतास. निर्जीव ! नेहमी सळसळत असायचास. ही मिस दत्त नाही. ही नवीन आहे. मग डोळे मिचकावून विचारले,

" बोलणार? मी नेहमी येतो. माझी चांगली ओळख झालीय. लीला भट्टाचार्य. बोलायचंय ?"

" नको " श्याम हळूच हसला.

श्यामने मान वळवली. काचेच्या दरवाजातून ती दिसत होती. कुतूहलाने त्याच्याकडेच पहात होती. श्यामने परत मान फिरवली.

" काय झालंय तुला श्याम ?"

" कोण जाणे, कुठंतरी, काहीतरी बिघडलंय. "

" काय ?"

" शाळेत होतो तेव्हा पोरी दिसल्या की मी नर्व्हस व्हायचो. मला कुणाबद्दल प्रेम वाटतं की नाही म्हणून पोरी मला विचारायच्या. आता तिथं बसल्याबसल्या मला वाटलं, आपण अन्याय करतोय. मी चोरासारखा उठून आलो. पूर्वी मी अशा कितीतरी ठिकाणी अगदी सहजतेनं जायचो. स्मार्टली बोलायचो. काऊंटरवर रेलून रिसेप्शनिस्ट पोरीला ' हॅलो ' करायचो."

अरुणने प्रश्नार्थक चेहऱ्याने पाहिले.

" उलथापालथ झालीय. खूप दिवसांनी माझ्या लक्षात आलंय. मी प्रेमात पडलोय. "

" लीलाच्या ?"

" नाही, कुठल्याच मुलीच्या नाही. मलाच आश्चर्य वाटतं. इतके दिवस वृन्दा, माधवी, इतूबरोबर मी फिरलो, एका बिछान्यात झोपलो, मस्तकापासून पायापर्यंत न्याहाळलं. तेव्हा कधी माझ्या छातीत आगगाडीची धडधड झाली नाही. ह्यात काही गुप्त आहे असंही वाटलं नाही. कोणीही काही द्यायला कमी केलं नाही तरीही माझं मन तृप्त झालं नाही. छातीत कुठंतरी ते दुःख दबा धरून बसलंय. "

“काय सांगतोयस रे ?”

“खरं ते सांगतोय. अंतर्ज्ञान नसेल तर पोरींना नीट ओळखता येत नाही. कोणी म्हटलंय हे ?”

“कोण जाणे, रामकृष्ण, कृष्ण कुणीतरी असेल.”

“असेल.”

अरुण थोडा हसला. “लीला भट्टाचार्यने तुला अर्ध्या तासात साक्षात्कार घडवला ?”

“नाही. मलाच झाला. माझ्या काळजात धडधड सुरू झाली. अतृप्ती बोचायला लागली. मनात आलं, सर्वांत आपल्याला पोरीच जास्त फसवतात. आपलं सर्वस्व घेऊन जातात. वर आणखी खरं गुपित पदरात बांधून ठेवतात. किंवा कदाचित ते रहस्य उघडच्या लिफाफ्यासारखं समोर खुलत असेल. म्हणत असेल, ‘पकड’ आणि मला पकडता येत नसेल. त्या पोरीनं मला प्रश्न विचारला,‘ आपल्याला काय पाहिजे ?’ तेव्हा मी स्वतःलाच म्हणालो, “भिकारी.” मनात आलं, ‘मला नाव नाही, ओळख नाही, मी एक तुच्छ इनसिग्निफिकंट. माझा जन्म झाला नसता तर जगात कुठंच वाढ थांबली नसती. नाश झाला नसता. मला समजत नाही, मी झाड म्हणून का जन्माला आलो नाही ? पाण्यात मासा म्हणून का जन्मलो नाही ?”

“श्याम–”

“इतके दिवस मी स्वतःला कोणी इम्पॉर्टन्ट व्यक्ती समजत होतो. मला वाटायचं आपल्याला कोणतीही गोष्ट अवघड नाही. सर्व काही सहजसाध्य आहे. जे काही मिळालं तो ‘भूल’ होती. इतके दिवस मित्र मला फसवत आले. नाहीतर माझ्या छातीत ही धडधड का ? मला दरवाजा शोधून का सापडत नाही ? झाडाची सावली शोधली तरी गवसत नाही. कुठं चूक होतेय ? इतके दिवस सगळी दारं माझ्या ओळखीची होती. सहजासहजी उघडत होती आणि आता प्रेमासाठी गुडघे मोडायची, याचना करायची इच्छा होतेय.”

“काय झालंय तुला ?”

“काही नाही.”

“हट् साला.” हा हा करून अरुण हसला. हसता हसता आपल्या पोटाकडे

अंगठा दाखवून म्हणाला, "सगळ्याच्या मुळाशी हे पोट आहे. पोटात वारा धरतो म्हणून हे सगळं होतंय. रोज रात्री इसबगोल घे. खूप दूध पी. सकाळी गरम पाण्यात लिंबाचा रस घे. मी बॅचलर होतो तेव्हा माझी पोटाची अशीच तक्रार होती. लीला भट्टाचार्येला मी सांगेन, तू 'सेंट ॲण्ड मिलर' मध्ये ऑफिसर होतास. उत्तम खेळाडू होतास. त्यानं दाढी राखलीय. अंगावर शाल घेऊन हिंडतोय म्हणून त्याच्या बाहेरच्या वेषावर जाऊ नकोस."

एक्स्प्लनेड फूटपाथवर अरुणने टॅक्सीला हाक मारून टॅक्सी थांबवली. "चल, तुला घरापर्यंत सोडतो." तो श्यामकडे वळून म्हणाला.

"नको, मला घरी जायची घाई नाही. मी फिरत फिरत जाईन. तू. जा."

टॅक्सीचा दरवाजा बंद करायच्या आधी अगदी हळूच अरुण म्हणाला, "मन बसलं असेल तर थांबू नकोस. नेहमी जात जा. मी बघेन. नोकरीसाठी माझ्या सासऱ्याकडे जा. त्याची फर्म आहे. तुझं काम होऊन जाईल."

बोलता बोलता एखाद्या बनेल माणसासारखा अरुण हसला. म्हणाला, "बघ, माझी तब्येत कशी आहे ? ठीक आहे ना ?"

"ओ, फाईन."

"फॉर अमेरिका, दि लॅण्ड. ऑफ फ्री सेक्स. तू बघतच रहा, साठ वर्षांचा झालो तरी माझी तब्येत कशी राहील ते. चीरिओ."

टॅक्सी सुरू झाली. अरुणने हात बाहेर काढून हालवला. अरुण परका वाटला श्यामला. त्याला वाटले तो आपल्याला नीट कळलाच नाही. तरीसुद्धा मनात वाटत होते 'आपण अरुणला ओळखलंय.'

श्याम चालत राहिला. अनिर्बंध, अविरोध ! भुंग्याच्या आवाजासारखा मोटर-सायकलचा आवाज डोक्यात घुंई घुंई करीत होता. ख्रिसमससाठी दुकाने सजवली होती. म्हातारा सांताक्लॉज, कृत्रिम पाईनवृक्ष डोळ्याजवळ येऊन दूर जात होते. त्याला अस्थिर वाटत होते.

एक माणूस हॅण्डबिले वाटीत होता. त्याने श्यामच्या हातात एक कागद खुपसला. त्यावर लिहिले होते, 'आपल्यावरचं संकट टळलंय.' खाली औषधाची जाहिरात होती. कागद दुमडून श्यामने टाकून दिला. मग मनाशी म्हणत राहिला, 'वा, संकट टळलंय. आता आणखी संकट नाही.'

## (८)

परतताना श्याम ट्राममध्ये शिरत होता. शिरताना खिडकीशी बसलेल्या एकाने त्याला अभिवादन केले. त्याने पायजमा घातला होता. डोक्याला टोपी घट्ट बसवली होती. डोळ्यात सुर्मा. " इरफान ?"

" इरफान, कसं काय ?"

ट्राममध्ये येताच इरफान आदराने उठला. " बसा चक्रवर्ती बाबू " इरफानच्या खांद्यावर हात ठेवून श्याम म्हणाला, " अरे, नाही. नाही. तू बस. "

" आपण बसा. पार्क स्ट्रीटला मला उतरायचंय. "

श्याम बसला. हसून त्याने विचारले, " काय खबरबात ?" इरफानच्या चेहऱ्यावर तेच हसू होते. " हल्ली येत नाही आपण ? "

" नाही." हल्ली इरफानकडे, बाजारात श्याम गेलाच नव्हता. कारणच नव्हते. पूर्वी दर महिन्याला जायचा. तेव्हा इरफानने श्यामला अडीचशे रुपये मिळवून दिले होते. आपल्या एका नातेवाइकाला त्याने चिठी लिहिली. " आपल्या दक्षिणेकडच्या बागेत खूप आंबे आलेत. बनिखाडाच्या कमलबक्ष चक्रवर्तींना दोनशे आंबे पाठवून द्यावेत. "

बाबांनी त्या वर्षी बरोबर अडीचशे रुपये मिळवले.

" व्यापारधंदा कसा चाललाय ?" त्याने इरफानला विचारले.

" मंदी आहे सध्या."

इरफान हळूच म्हणाला, " आता सगळा व्यवहार सहाबाबूंच्या व ढाक्याच्या मारवाडी लोकांच्या" हातात आहे.

श्यामने नीट ऐकलेच नाही. मैदानावर अंधार पसरत चालला होता. अंधार कापीत ट्राम चालली होती. वारा घूंघूं करून वाहात होता. इरफानच्या सुरमाभरल्या डोळ्यांकडे तो पहात राहिला.

पार्कस्ट्रीटवर उतरण्या आधी श्यामच्या कानाशी तोंड नेऊन इरफान कुजबुजला, " पाकिस्तानमध्ये जायचं असेल तर सांगा. आपला एक चांगला एजंट आहे. बॉर्डर ओलांडून देईल. दहा दिवसांत फिरवून परत आणील. कसली भीती नाही."

पार्क स्ट्रीटवर इरफान उतरला. रस्त्यावरून त्याने परत नम्रतेने अभिवादन केले. श्यामच्या मनात आले, ' हा मुसलमान, आपण हिंदू ' आपण हिंदू आहोत हा विचार कितीतरी दिवस त्याच्या मनात आला नव्हता. त्याला हसू आले. आपण हिंदू ? का ? हिंदू आहोत म्हणजे कसे आहोत ? खूप शोध घेतला. पण त्याला त्या शब्दाचा अर्थ कळेना. त्याचा विश्वास बसेना. आपण हिंदू आहोत ? भारतीय ? बंगाली ? कमलाक्ष चक्रवर्तीचा मुलगा ? राहणार–बानिखाडा, जिल्हा–चाका. आपण श्याम चक्रवर्ती आहोत ? सेंट ॲण्ड मिलरमधला छोटा साहेब. नोकरीवर लाथ मारून बाहेर पडलेला ? ह्या नावाशी परिचयाशी आपला काही संबंध आहे हे त्याला खरेच वाटेना. ह्या नावा-परिचयापलीकडे आपल्याला काहीच अस्तित्व नाही ?

ट्राम धुक्यातून चालली होती. मैदानावर चंद्राचा फिका प्रकाश पडला होता. खिडकीच्या कडेला डोके टेकून श्याम बसला. तो भान विसरला. बाजूचा सारा परिसर विसरला. ट्रामगाडी कुठल्याशा अज्ञात, अपरिचित प्रदेशात शिरत होती. चहूबाजूंनी चंद्राचा प्रकाश आणि धुके पसरले होते. हूँ हूँ करून माळ जणू रडत होता. पाखरांसारख्या झाडांच्या छाया गोळा झाल्या होत्या.

" तिकीट ?"

कंडक्टर विचारीत होता. श्यामला शुद्ध नव्हती.

मायावी ट्रामगाडी ओळखीचा रस्ता सोडून अनोळखी रस्त्याकडे जात होती. इकडे तिकडे भरकटत होती. झाडेझुडपे हाका मारीत होती, " श्याम ये, ये श्याम. "

फिसफिसून वारा बोलवीत होता, " श्याम, ये. "

त्याला स्पर्श करून वारा पळत होता. कुठेतरी खोल साम्राज्यात, पहाडात, गुहेत, नदीत, नाहीतर समुद्रात. सुगंधासारखा चारी दिशांनी एकच आवाज येत होता. " श्याम, आमचा श्याम. "

मातीवर पाऊल पडताच, आईच्या मायेने मातीने हाक मारली, " श्याम " पक्ष्याच्या चोचीतून पाणी पडावे तसे दव गवतावर साचले होते. झाडाखाली अंधार झोके घेत होता. चमचमत काजवा फिरत होता. खारट पाण्याचा ओशट वास येत होता. निःशब्द रात्री चमकणाऱ्या पाण्यात मोठा मासा विहरत होता. शांत पाण्यात, पऱ्यांच्या राज्यात खोल जात होती त्याची छाया !

दूरवर गंगेच्या पाण्यावरून बोटीचा आवाज आला, 'भाँ' डोक्यावरून आवाज हवेत मिसळून गेला.

मैदानाजवळून जाताना निमिषार्धात स्वप्नासारख्या त्या देशाला श्याम स्पर्श करून गेला.

तो ट्राममधून उतरला. गाडियाबाजारच्या वळणावर आला. त्याच्या अंगाला एक म्हातारा घसटून गेला. खोल स्वरात ओरडत होता "गंजी."

श्याम काही पावले चालून गेला. पुन्हा त्याच्या कानांवर शब्द आले, "गंजी."

हाक दूर गेली, श्यामच्या कपाळावर घामाचे थेंब तरारले. पण विश्वास बसेना, तो चालतच होता आणि एकदम उभा राहिला. अस्फुट स्वरात म्हणाला, "सोनाकाका–"

श्यामने गर्दीतून जायचा प्रयत्न केला. त्या वेळेपर्यंत हाक खूप दूर गेली होती. मान हालवून तो पुटपुटला, "अरे, सोनाकाका!" त्याच्या मनात सोनाकाका उभे राहिले. त्याच्याकडे पाहून म्हणाले, "अरे मनू? मग मान हलवून म्हणाले, "होय, मनूच."

त्यांच्या खांद्यावर हात ठेवून श्याम म्हणाला, "सोनाकाका, आणखी काही दिवस थांबा, इच्छाशक्तीवर दिवस काढा."

हॉटेलात सुबोध भेटला. भुवया उंचावून म्हणाला, "महाराज, आज एक पर्व घडलं. प्रेमपर्व. खूप इंटरेस्टिंग आहे."

"बरं." सुबोधला हसू आले.

"पोरगी कुमारी होती. ती झटक्यात विधवा झाली. डबल प्रमोशन. मध्यंतरी महिनाभर आली नाही. आज आली. अंगावर पांढरे कपडे. हातात बांगड्या नाहीत, कानात डूल, गळ्यात हार काहीच नव्हतं. प्रथम काही विचारायचा मला धीरच झाला नाही. मनात आलं, ही परवाची पोरगी, विवाह झाला नाही आणि हे काय? विचारले. म्हणाली, "माझे पती मारले गेले. मी विधवा झाले." म्हणून रडायला लागली.

"लग्न कधी झालं?" मी विचारलं.

"झालं."

"पण कधी?"

तिच्या तोंडून शब्द फुटेना. कष्टाने म्हणाली, "लग्न झालं नव्हतं पण होणार होतं. मी मनानं त्यांला वरलं होतं. पण कधीच प्रत्यक्षात घडलं नाही."

"पोरगा ॲक्सिडेंटमध्ये मारला गेला. असं ऐकतो." सुबोध म्हणाला. आणि गंभीर झाला. म्हणाला, "बघितलंस, सगळंच विचित्र. ह्याला म्हणतात प्रेम. काय सांगायचं ?"

श्याम हसला. भुंग्याच्या भुणभुणीसारखा मोटरसायकलचा आवाज त्याच्या मस्तकात घुमू लागला. ॲक्सिडेंट ? कशाचा ॲक्सिडेण्ट ?

सुबोध थोडा वेळ गप्पच होता. मग म्हणाला, "काय बोलायचं ? हल्ली लोक म्हणतात, प्रेमबिम काही नसतं. केवळ ॲडजस्टमेंट, तडजोड. माझाही हल्ली त्यावर विश्वास बसायला लागला होता. आज त्याला धक्का बसला. मनावर दडपण आल्यासारखं वाटतं. मेंदूत रक्तस्राव सुरू झाल्यासारखं वाटतं."

जेवण संपवून दोघे आचवायला गेले. वळताना सुबोध म्हणाला, "श्याम, जसं काही मलाच कोणी विधवा करून गेलंय. पुरुषाचे कपडे घातलेय पण मी अंतर्यामी... हसू नकोस, एखाद्या दिवशी असं वाटतं की निर्जन घरात एकटं राहून खूप रडावं."

रात्री श्यामची झोप उडाली. त्याच्या कानावर शब्द आले, "गंजी."

इतक्या रात्री ? पांघरूण सारून तो खिडकीशी गेला. डाव्या बाजूला पाहिले, रस्ता निर्मनुष्य, उजव्या दिशेला पाहिले, रस्ता निर्मनुष्य.

खूप खूप लांबून शब्द येत होते, "गंजी."

"सोनाकाका !" कानांवर हात झाकून श्याम सुन्न मनाने उभा राहिला.

त्याने आकाशाकडे नजर वळवली. निश्चल कालपुरुष, नक्षत्रांचा छायापथ, तेच शुभ्र आकाश, नक्षत्र, तारे, ताऱ्यांवर तारे, छायापथ ओलांडून जाणारे, अशक्त. जवळजवळ अंध. सोनाकाका जाता जाता म्हणतात, "गंजी !"

## ( ९ )

'तेवीस डिसेंबर, मोटरसायकलच्या अपघातात एका व्यक्तीचा मृत्यू.' श्याम रोजचा पेपर शोधीत होता. पहिल्या पानापासून शेवटच्या पानापर्यंत. पण छे, ही

बातमी कुठंच येत नव्हती. अनेक प्रकारांनी माणसं मरत होती. उंदीरझुरळांसारखी, पाणी न मिळालेल्या झुडुपांसारखी. अशी मरत मरत पृथ्वीवरची गर्दी कमी झाली तर हळूहळू पृथ्वी निर्जन होईल.

हा विचार येताच श्यामचे मन आनंदाने उसळून आले.

मग हे शहर सुंदर होईल. पृथ्वी सुंदर होईल, सगळी माणसं सगळ्यांची परिचित होतील. सगळ्या पृथ्वीवर प्रेमाचं वातावरण नांदेल. स्पर्धा असणार नाही. आक्रमण होणार नाही. माणसाच्या वाणीतून शिव्यांचा लोप होईल. कठोर, अश्लील शब्द ऐकावे लागणार नाहीत.

पक्षी परत जन्माला येतील. प्रजापती येईल आणि पृथ्वीवर कोंब फुटतील. सुंदर सुगंधी वारा वाहील. दूरचे शब्द ऐकू येतील. गंध येईल आणि आपण स्वतःच्याच मुठीत मावण्याइतके होऊन जाऊ.

विदूषक कोणता आणि सैतान कोणता ते ओळखता येईल. आत्तासारखा गोंधळ होणार नाही.

किंवा सगळी पृथ्वी निर्जन होईल. हळूहळू मानवविरहित होईल. शहर, हा देश. एकट्या श्यामशिवाय सगळ्या पृथ्वीवर एकसुद्धा माणूस वाचू शकणार नाही.

विचार करता करता पायाखाली त्याने सिगरेटचे थोटूक चिरडून टाकले. टेबलावर पाय पसरून बसला. काठीने पुस्तक दूर सारले. तापाने आजारी असलेल्या माणसाचे केस जशा जटा व्हाव्या तसे झालेले आपले केस चाचपू लागला. आरशात आपलाच चेहरा त्याला अनोळखी वाटला.

हां मग ? काय होईल ? माणसानं निर्माण केलेले कारखाने हिरव्या गवतात डुबून जातील. आगगाड्या, इंजिने हळूहळू मातीत मिसळून जातील. जहाजांचे पाणी होईल. विमानांना वेली फुटतील. उंच उंच घरांवर अश्वत्थ वृक्षाची पाने उडतील. वस्तू आमच्या घरातच निर्माण होतील.

एका मासणासाठी सूर्य उगवेल. चंद्र उगवेल आकाशात नक्षत्र येईल. एके ठिकाणी पाणी साचेल. बाकी सगळीकडे मोकळी जागा असेल. आपणच प्रश्न विचारीत होता. आपणच उत्तर देत होता.

" तुला एकटं वाटणार नाही ?"

" नाही. "

"तुला कुणीच असणार नाही. आईसारखं, वृन्दा, माधवी, इतूसारखं, लहान मुलासारखं, भावासारखं."

"नको."

"तू बोलायला विसरून जाशील. गाणं विसरून जाशील, संवाद विसरशील. रतिक्रीडा विसरशील. तुझ्याजवळ सौंदर्य असं राहणार नाही, जवळ येऊन दूर जायलाही कुणी असणार नाही."

मान हालवून श्याम हसला. आरशात पाहून त्याने प्रश्न विचारला, "सांग, कोण एकटा आहे? ज्याच्या भोवतालचा परिसर शून्य आहे. ज्याला जवळचं कुणी नाही, ज्याच्यापासून दूर जाणारं कुणी नाही. जवळ येणारं कुणी नाही. असा स्वयंपूर्ण कोण?"

"मी."

श्यामने पुन्हा वर्तमानपत्र उघडले. छे, तो मोटरसायकलवाला मेला नव्हताच. साधी जखमसुद्धा झाली नव्हती. तो चौकामध्ये उभा राहिला असेल. एखाद्या वळणा-वरून श्याम कधी येतो आणि आपण त्याच्यावर किरणांचा झोत कधी टाकतो ह्याची तो वाट पहात असेल.

छे, तो नक्की मेला नव्हता. श्यामचे मन निश्चित झाले. तो खिडकीशी उभा राहिला. रस्त्यावर स्पष्ट दिसत नव्हते. लाल रंगाचा वळणावरचा डाक बंगला, लॅम्पपोस्टरवर लावलेली सिनेमाची जाहिरात, लाल, पिवळी, पांढरी घरे सारे अस्पष्ट होते. दत्तांच्या बागेत कावळा उडत होता. पाच कुत्री जिन्यावर झोपली होती. दोन टॅक्सीज गेल्या. पाठोपाठ हळूहळू हातगाडी, एकदोघी मुली. काही निर्विकार चेहऱ्याचे लोक. सकाळचे किरण शेतातल्या पिकासारखे चारी दिशांना पसरले होते. सगळे स्पष्ट स्वच्छ होते. कुठेच संशयास्पद वाटत नव्हते.

श्यामला वाटले. पडद्याआडून दोन डोळे निरखून निरखून हे सर्व डोळ्यात साठवून ठेवताहेत. ज्याच्यावर आपण किरण फेकले तोच माणूस असेल? मिनू-सारखा निष्ठुर. श्यामने त्याचा चेहरा पाहिला नाही. त्याचे शरीर, त्याचा रंग निरखला नाही. त्याची उंची पाहिली नाही. त्याच्या घरात कोण माणसे होती तेसुद्धा त्याला माहीत नव्हते. कदाचित् सुबोधच्या ऑफिसमधल्या कुमारी विधवेचा तो प्रेमिक असेल, किंवा कशावरून मिनू नसेल? किंवा त्याचा मित्र?

तरीसुद्धा पृथ्वीवर जितके लोक कमी होतील तेवढे चांगले असे त्याला वाटले म्हणजे मग पृथ्वी प्रेममय, रहस्यमय, स्वप्नासारखी होईल.

श्याम एक्स्प्लेनेड रस्त्यावरून चालला होता. एकाएकी अवेळी पाऊस सुरू झाला. आकाशात नकळत ढग जमत होते. श्यामच्या लक्षात आले नाही. अकस्मात चहू-बाजूंना हरणांच्या खुरांचे आवाज ऐकू येऊ लागले. सर्व सृष्टीत हरणे मोकळी सुटली होती. निर्बंध, मुक्त चारी पायांवर उधळत होती.

श्यामने लगबगीने एका गॅरेजचा आश्रय घेतला. माणसांनी गर्दी केली होती. मळका, घामट रुमाल श्यामने खिशातून काढला. खूप दिवसांनी तो उपयोगाला आला. त्याने केसातले, दाढीतले पाणी पुसले. वारा जोराचा होता. श्यामला थंडी भरली. गर्दीत एखादा जाडाजुडा माणूस दिसतो का तो पहात होता. म्हणजे त्याच्यामागे लपता आले असते. श्यामची निराशा झाली. सिगरेटसाठी त्याने खिशात हात घातला. परत निराशाच झाली. कमानीखाली सिगरेटचे एक दुकान होते. तिथे येऊन श्याम उभा राहिला. तिथल्या चार फुटी आरशात त्याला स्वत:चे रूप दिसले. कंगाल, भिकाऱ्यासारखे !

आरशातच त्याने पाहिले. मागे गर्दीत एक मुलगी होती. मान वळवून वळवून पहात होती. सिगरेटसाठी सुटे पैसे घेतलेला हात त्याने पुढे केला होता तो तसाच राहिला. छातीचे ठोके वाढले. आगगाडीचा धाड्धाड् आवाज सुरू झाला.

आपल्याकडे कोणीतरी पाहात आहे हे लक्षात येताच तिने कौशल्याने नजर वळवली. थोड्याच वेळात परत मान फिरवली, श्यामच्या अंगावर काटा उभा राहिला. त्याला तिचा चेहरा ओळखीचा वाटत होता. पण हा सुंदर चेहरा आपण कुठं पाहिला ते त्याला आठवेना. ते कपाळावर रुळणारे केस, गोल, बोलका चेहरा. आपण अजून लहान आहोत. कितीतरी जग अजून पहायचे आहे.

हा चेहरा आपण कुठं पाहिलाय ? केव्हा ? पाठीमागून तिची उंच, बाकदार मान तेवढी दिसत होती. फिक्कट निळ्या रंगाची साडी आणि त्याला शेंदरी रंगाचे काठ, गळ्याभोवती काश्मिरी स्कार्फ. दोन्ही हात मुडपून छातीशी घेतले होते. एखादी वस्तू कवटाळून धरावी तसे. कदाचित् पर्स असेल !

केसांचा मोठा अंबाडा घातला होता. त्यावर पाण्याचे बिंदू चमकत होते. तिचा चेहरा पाहण्याची श्यामची इच्छा होती पण ती तोंड वळवीत नव्हती.

श्यामने सुटे पैसे परत खिशात टाकले. मृदू हसत तोंडातल्या तोंडात पुटपुटला, "तुला कुठंतरी पाहिलंय. कुठं ते आठवत नाही. शोधून काढायला फार त्रास होईल. परंतु उभी राहा. तुला समोरून पाहू दे."

त्याला जवळ जायचे धैर्य होईना. तो गर्दीत घुसला. वाकून, एक गोल फेरी मारून तिच्या समोरच्या बाजूला येऊन उभा राहिला. तिच्यापासून स्वतःला खूप दूर ठेवायचा प्रयत्न करीत होता. माणसे त्याच्या दिशेने पहात होती. श्याम त्यांच्याकडे लक्ष देत नव्हता.

एका म्हाताऱ्या पंजाब्याच्या पायावर त्याचा पाय पडला. पोराच्या पाठीवर हात ठेवून तो चालला होता. दोन मुलगे बोलत चालले होते. तो गर्दीच्या मध्यभागी आला. त्याच्याजवळची माणसे छायेसारखी नाहीशी होत होती. कोणाचे अस्तित्व तिथे नव्हते आणि तो तिच्याजवळ पोचला. तिच्या कानातले इयरिंग्ज, गालाचा बाक, थोडेसे बसके नाक, ओठ, गोल चेहऱ्याच्या सान्निध्यात तो आला आणि तिथेच उभा राहिला.

श्याम फूटपाथवर आला. अंगावर पावसाचे थेंब पडत होते. वाऱ्याने अंगावरची शाल निशाणासारखी फडफडत होती. तो चोरासारखा तिच्याकडे पहात होता. पावसाचा आवाज त्याला हरणांच्या खुरांसारखा वाटत होता. त्याच्या चेतना तिथे एकवटल्या होत्या.

तिच्या शरीराला घसटून अनेक जण जात होते. केवढं धैर्य ! पुन्हा एकदा श्यामच्या मनात आले, खूप दिवसांत आपण स्वतःला सजवलं नाही. गालावर दाढी वाढली होती. वाढलेले केस जटांनी भरले होते. अंगावरची शाल मळली होती. शरीराला नुसती कळा आली होती. तो रोगट, अशक्त झाला होता. इतरांसारखे पोरींजवळ जायचे धैर्य त्याला होत नव्हते. आपले तराफ्यासारखे तरल मन कुठे गेले ? कुठे गेला खेळकरपणा ? छातीमध्ये तोच आवाज ! धाड्धाड् ! आगगाडी पुलावरून जाताना व्हावा तसा ! त्याने आपल्या छातीवर हात ठेवला. छे ! त्या अनोळखी श्यामची त्याला ओळख पटेना.

शरीरात, मनात, आत आत ढग गडगडाट करीत होते. विजा चमकत होत्या. वृष्टी होत होती. छाती भरून आली होती प्रेमाने !

त्याची दृष्टी तिच्या चेहऱ्याकडे गेली. कपाळाला आठ्या घालून ती एकटक

पहात होती. ती अस्वस्थ झाली. दृष्टी फिरवून ती एकदोन पावले मागे सरली. परत उभी राहिली.

श्याम तिच्यासमोर फूटपाथवर उभा होता. तिने तोंड फिरवले. असहाय्य नजरेने चारी दिशांना पाहिले. ओठ दाबून धरले. रागाने मातीत पाय घासले.

श्यामच्या भोवतालचे आवाज थांबले होते. अनेकांचे लक्ष त्याच्याकडेच होते. आपापसांतले बोलणे थांबवून अनेक जण त्याच्याकडेच पहात होते. त्या पोरीकडे पहात होते. श्याम दचकला. त्याचे हातपाय थरथरू लागले. त्याने स्वतःकडे पाहिले. आपण काय करतोय ? इतका वेळ आपण काय करतोय ?

त्याने तोंड फिरवले. त्याच्या चेहऱ्यातून गरम रक्त वाहू लागले. अपमानाने शरीर थरथरू लागले. फूटपाथ सोडून तो झटकन् रस्त्यावर आला. पाऊस पडतच होता. तो चालत राहिला.

नंतर फक्त हरणे! चोहो दिशांनी धावताहेत. उधळताहेत. त्यांच्या खुरांचे आवाज! जितक्या दूरवर दृष्टी जात होती तिथपर्यंत सर्वत्र झिरमिरणाऱ्या पावसाची धूसरता. रस्ते, घाट, मैदान सारे त्या धूसर वातावरणात बुडून गेले होते. रहस्यमय झाले होते. निश्चित मनाने श्याम चालत होता.

पावसाच्या गांडुळांसारख्या रेषा डोक्यावरून, गालांवरून, दाढीवरून खाली झरत होत्या. थंडीने शरीर कापत होते. त्याला वाटले, पोटात कुठेतरी गरम पाण्याचे झरे वाहताहेत. छातीत धडधड, मेंदूत यंत्रासारखा एकच प्रश्न, तू कोण ? तू कोण ?

आणि एकदम प्रकाश पडला. टेलिफोन हाताळणारे, वहीवर झरझर लिहिणारे गोरे हात, मधाळ रंगाची साडी, "लीला"

हाय ! श्यामला हसू आले. देवा, देवा तुझ्यासाठीच भर पावसात हिंडलो, शरीरावर गारवा झेलला. मग दोन्ही हात वर उचलून म्हणाला,

"कबूल, जय तुझाच झालाय !"

खूप दिवसांनंतर श्यामला आपण जिवंत आहोत असे वाटले. शरीरात कारखाना चालला होता. धाड्धाड्, धाड् धाड्.

रात्री अर्ध्या झोपेत उशीवर नाक घासून तो हसत होता. जप करीत होता, "लीला, लीला !"

## ( १० )

स्वत:ला लपवण्याचा श्यामने प्रयत्नच केला नाही. उन्हात, मोकळ्या रस्त्यावर तो मध्येच थांबला. दूर काचेचा दरवाजा दिसत होता. त्याने गॉगल काढले. उन्हाने त्याचे डोळे दिपले. थोडा वेळ काही दिसेना. डोळ्यांवर हात धरून त्याने उन्हाची तिरीप अडवली. काउंटरवर लीला सावलीसारखी दिसली. प्रथम अगदी अपरिचित वाटली. मागच्या ट्यूबचा प्रकाश तिच्यावर पडत होता. लीलाचे दोन्ही हात कामात होते. कपाळावरच्या बटा ती मागे सारीत होती. उजव्या हातात पेन्सिल होती. डाव्या हातात फोन. रिसीव्हर कानाशी नेऊन ऐकत होती मधूनच 'हॅलो' म्हणत होती. डोळे झोपाळू दिसत होते.

काम करता करता व्हिजिटर्सशी बोलत होती. हसत हसत उत्तरं देत होती. केवळ व्यवहारासाठी, बढतीसाठी, संचय करण्यासाठी लीला नोकरी करतेय हे त्याला पटेना. एखाद्या नावाशी, परिचयाशी ती संबंधित आहे असेही त्याला वाटेना.

श्याम एखाद्या झुडुपासारखा उभा राहिला होता. त्याच्या चेहऱ्यावर स्मित होते. त्याच्या समोरून सावल्या सरकत होत्या. असत्य माणसांच्या. त्यांचे काही अस्तित्व नव्हते. खांद्यावर शाल झुलत होती. चारी दिशांना शांतता होती. जणू तो एका निर्जन घरात उभा होता. समोरचा काचेचा दरवाजा उघडून लोक ये, जा, करीत होते. पण कोणाचाच चेहरा स्पष्ट दिसत नव्हता. दोन भिकारी समोर येऊन तोंड वेंगाडू लागले. पुरुष होते की स्त्रिया होत्या हेसुद्धा श्यामने पाहिले नाही. त्याने त्यांच्या हातांवर पैसे ठेवले. किती दिले ह्याचा विचारही त्याच्या मनात आला नाही. घड्याळाकडे त्याने एकदाही पाहिले नाही. किती वाजले हा प्रश्न त्याच्या दृष्टीने केवळ सजीवांचा होता. त्याला एवढेच समजत होते की फक्त दोन पायांच्या जोरावरच तो इथे उभा राहिला नव्हता. जन्माला येण्याच्या आधी पोटामध्ये मुलाची अस्थिर हालचाल व्हावी तशी त्याच्या शरीरात अस्थिर हालचाल होत होती. शालीखाली त्याचे सारे शरीर कठीण झाले होते. सगळ्या पेशी आणि हाडे लोखंडासारखी झाली होती. हळूहळू छातीत पावसाचा आवाज कमी कमी होत चालला.

लीला काम करीत होती. तिचे दोन्ही हात कामात गढून गेले होते. ओठ बोलत होते. ती काय बोलत होती श्यामला समजत नव्हते.

हां, माहीत आहे तू काय बोलतेस ते, तू दूरदूरच्या लोकांशी बोलतेस. माझ्याकडे
पहा. माझं अजून वय झालं नाही. माझं आयुष्य रहस्यमय आहे. मी प्रेम करायला
शिकतोय.

मधन मधून त्याचे डोळे रस्त्यावरून फिरत होते. कोणाचा काळा कोट, झाडाचे
पान, कावळे, भिंत !

एवढ्या गर्दीतून ती एकदा तरी आपल्याकडे पाहील. श्याम वाट पहात राहिला.

प्रकाश मावळत चालला. अंधार पडला. आता लीला त्याला पाहू शकणार नव्हती.
पण टयूबच्या प्रकाशात लीला मात्र अधिक स्पष्ट दिसणार होती. श्याम तिथेच
उभा राहिला. कदाचित् काहीच घडणार नाही. कदाचित् आश्चर्यकारक असे काही
घडेल. श्यामला काहीच सांगता येत नव्हते.

काउंटरवर लीलाच्या समोर येऊन एक जण उभा राहिला. लीलाचा चेहरा
झाकून गेला. माणूस उंच होता. श्यामच्या समोर सिगरेट ओढीत उभा होता. कितीतरी
वेळ. श्याम चिडला. त्याच्या मनात आले ' आपण आठ फूट उंच व्हावे. ' जणू काही
श्यामच्या मनातले त्याला कळले. तो भराभर दूर निघून गेला.

'मिनू की काय ?' श्याम आश्चर्याने पहात होता.

क्षणात तो त्याला विसरला. लीलावर डोळे जडवून उभा राहिला. लीलाच्या
चहू बाजूंनी प्रकाश वाढत होता. श्यामच्या चहू बाजूंनी अंधार खाली खाली उतरत
होता. थोड्याच वेळात श्याम अंधारात बुडून गेला असता. अंधाराने त्याला गिळून
टाकले असते.

त्याच वेळी लीलाने डाव्या हातात टेलिफोन घेतला. चेहरा वर करताच तिचे
लक्ष श्यामकडे गेले. क्षणभर लीला स्तब्ध झाली. ती तोंड दाबून पहात राहिली.
तोंडातून किंकाळी बाहेर पडणार तोच तिच्या उजव्या हाताचा पंजा तिच्या तोंडावर
आला. त्या किंकाळीने लोक गोळा झाले असते.

श्यामच्या सावलीसारख्या आकृतीकडे ती पहात राहिली. तिचे हात शिथिल
पडले. पिवळ्या पेन्सिलीवरची तिची पकड घट्ट झाली. डोळे मिटून दात चावत चावत
ती फोनवर बोलत राहिली.

श्याम जागचा हालला नाही. केवळ हसला. हृदयात आवाज होत होते. कारखाना
चालू असावा तसे. त्याने छातीवर हात ठेवला. एक आगगाडी खूप दुरून अज्ञात
पुलावरून चालली होती.

आखडलेल्या हाताने लीलाने रिसीव्हर खाली ठेवला. ती काऊंटरवर रेलली. तिने सक्तीने मान खाली वळवली. उंच मानेच्या वक्राकार भागावर अहंकार आणि अपमान दिसत होता.

श्यामला वाईट वाटत होते. आजतरी आपण नटायला हवे होते. नटलो असतो तर लीलाने ओळखलेसुद्धा नसते.

गालावर वाढलेली दाढी, अंगावर शाल, धोतर आणि हाच चेहरा घेऊन त्याला असेच लीलाजवळ येणे भाग होते. नाहीतर इतर शेपाचशेजणांमध्ये तिने त्याची गणना केली असती. पेन्सिलीवरची तिची मूठ घट्ट झाली नसती. डोळे विस्फारले नसते, तोंड खाली वळवले नसते.

लीला भानावर आली. पण गाफील राहिली नाही. हसली नाही की तिने एकदाही श्यामकडे पाहिले नाही. मधूनमधून तिरप्या नजरेने दाराकडे पहात होती. कोणत्याही क्षणी दार उघडून श्याम आत येऊ शकणार होता.

श्यामला हसू येतच होते. तो अजून उभा होता. शरीराचा भार सहन होत नव्हता. मधून मधून पायांची अदलाबदल करीत होता. ह्या पायावरून त्या पायावर शरीराचा भार टाकीत होता.

अंधार झाला. श्यामच्या डोक्यावरचा दिवा लागला. श्यामच्या समोर एक मुलगा उभा होता. त्याला विचारीत होता, “चोरीचं पेन खरेदी करणार का ?”

श्यामने मान हलवली. खरे तर त्याच्या डोक्यात काही शिरले नव्हते.

ऑफिसेस सुटली होती. श्यामच्या चोहो बाजूंनी रस्त्यावरची गर्दी वाढत होती. रस्त्याच्या मध्ये उभ्या राहिलेल्या श्यामकडे कित्येक जण आश्चर्याने पहात होते. त्या दिवशी पावसात थांबलेल्यांपैकीसुद्धा काहीजण ह्यात असतील. ते लीलाला आणि त्याला ओळखीत असतील, श्याम उभाच राहिला.

लीलाने हातातले काम संपवले. तो पहात होता. तिने सगळे कागद एकत्र करून ठेवले. काहीवेळ ती नुसती बसून राहिली. द्विधा मन:स्थितीत. आता ती बाहेर येईल. ती उभी राहिली. साडीचा पिवळा रंग झळझळला. त्याला हिरवे काठ, हिरवा ब्लाऊज, उंच खुर्चीवरून खाली उतरताच ती अगदी लहान दिसायला लागली. कपाळावरचे केस बाजूला सारीत ती काउंटरवरून आत गेली.

थोडया वेळातच काचेचा दरवाजा उघडून सावलीसारखी बाहेर आली. खाकी पोशाखातला, प्यूनसारखा एक जण बरोबर होता. लीलाच्या जवळून तो चालत

होता. पाठोपाठ श्याम निघाला. ते दोघे भराभर चालत होते. त्या माणसाने टॅक्सी थांबवली. लीलाने मागे वळून पाहिले नाही. टॅक्सीतल्या अंधारात गुडुप झाली.

सगळ्या घटना क्षणार्धात घडल्या. श्याम मूर्खासारखा तिथेच उभा होता. तो जागच्या जागी थिजल्यासारखा उभाच राहिला.

रात्री जेवायच्या वेळी सुबोध भेटला. म्हणाला, "महाशय यांत्रिकीकरण येतंय. मजुरांना कमी करतील. मी त्यातून सुटतोय. नुकसानभरपाई म्हणून पुष्कळ पैसे देणार आहे कंपनी."

श्याम काहीच बोलला नाही. केवळ हसला.

"पंधरा वर्षांवर नोकरी झालीय." आपलं वय श्यामला कळेल हे सुबोधच्या लक्षात आलं नाही. म्हणाला, "सर्टिफिकेटवर पडलेल्या तारखेप्रमाणे माझं वय चाळीस येतं. पण आताच म्हातारा झाल्यासारखं वाटतंय."

ऑफिसमध्ये असलं की वाटतं, बाहेर हवा काय सुंदर आहे, खूप प्रकाश, खूप वारा आहे. सगळीकडे आनंदाचा जल्लोष चाललाय. अन् बाहेर यावं तर वेळ जात नाही.

पूर्वी फूटबॉल खेळावासा वाटायचं, कधीकधी पत्ते खेळायचो, त्यानं श्रम व्हायला लागले, थकवा यायला लागला. खूप दिवसांत पुस्तक, पेपरही वाचला नव्हता. कधीतरी भविष्याचं पुस्तक काढतो, हात बघतो अन हसतो. तो खाली वाकून दबलेल्या स्वरात म्हणाला, "माझ्या हातांवर अनेक चांगली चिन्हं आहेत. सुंदर स्पष्ट रेषा आहेत, बृहस्पतीचा माऊंट आहे." सुबोधने उजवा हात त्याच्यासमोर धरला. सुबोधचा पंजा मोठा, पसरट होता. मोठी नखं आणि हाताला चिकटलेला माशाच्या आमटीचा अंश !

श्याम म्हणाला, "वा."

माझा हातावर विश्वास आहे. ह्याच्या जोरावर मी कुठंही जाईन. शिवाय माझी हेडलाईन पहा. शुक्राचा उंचवटा चांगला कासवाच्या पाठीसारखा टणक आहे. गुरुस्थान प्रबळ आहे. हातावर प्रेमाचं चिन्ह आहे. 'लव्हमॅरेज' ओठ मुडपून सुबोध हसला. नाहीतर संन्यासी व्हावं. कसं ? बद्रिकेदार, काशी करीत हिंडावं. हिंडायची खूप इच्छा होते. पण हातून घडत नाही. हावडा ब्रीज चढायचाय हे मनात येताच नको वाटतं. हातपाय हालत नाहीत. किती दिवस झाले, आगगाडीत चढलो नाही.

बाहेर आल्यावरही सुबोधने श्यामला सोडले नाही. म्हणाला, "चल, खूप दिवसांनी आज मन हलकं हलकं वाटतंय. हिंडू या. शिवाय जेवल्यानंतर फिरणं चांगलं."

चालता चालता मध्येच म्हणाला, "घराकडे पाहिलं की आग लावून द्यावीशी वाटते. घरात थोडा वेळ थांबलं की भगभगायला लागतं. दबल्यासारखं, घाबरल्या-सारखं होतं. नुसतं, ह्या पेटीत हात घाल, ती ट्रंक उचक, खिडकीशी उभा रहा, दारात उभा राहा.

शिवाय, आमच्या भावनांची कदर करणारं कोणी नाही. केवळ हातपाय आहेत. भाऊ नोकरी करतोय, वहीण लग्न होऊन गेलीय. म्हातारे आईवडील नाहीत. हे एकलकोंडं घरच मला मारतंय. त्याच्यावर सगळी माया."दीर्घ श्वास सोडून त्याने शाल लपेटून घेतली. म्हणाला, "हे घर असंच उजाड राहू नये अशी इच्छा होती. फळाफुलांनी भरून जावं."

दोघे गोलपार्कपासून गाडियाबाजारच्या दिशेने निघाले. 'ऑटोमेशन' आलंय. यांत्रिकीकरण! सगळी कामं यंत्रं करतील. माणसांना सुट्टी. यंत्राकडूनच कामं चांगली होतील. माणसांकडून नाही."

श्याम हसला. सुबोध बोलतच होता.

"विधवा असली तरी माझी काही हरकत नाही. मला फक्त अगदी शांत, सुस्वभावी हवी होती. वय, जात, रूप कशाचीच अट नव्हती. पण तोंड उघडून कोणापाशी बोलू शकलो नाही. लाज वाटायची. वय वाढल्यावर लग्नाचे विचार मनात यायला लागले. लग्नाचं वय होतं तेव्हा फक्त त्या गोष्टी गोड वाटायच्या. आयुष्य फार मोठं आहे. योग्य वयात लग्न केलं नाही. आता ह्या वयात लग्नाबद्दल लोकांशी कसं बोलायचं? बोलू बोलू म्हणून शेवटपर्यंत बोलणं होत नाही. संकोच वाटतो."

गडियाबाजारजवळ सुबोधला सोडून श्याम पुढे गेला. एकाच वेळी त्याने सुबोधला आनंदी आणि दुःखी पाहिले.

थोडी पावले गेल्यावर सुबोध परत मागे आला. श्यामला म्हणाला, "कृपा करून मला असहाय्य, दीनवाणा समजू नकोस. मी निःशस्त्र नाही. खूप दिवसांपासून सगळी तयारी करून ठेवलीय. वेळ आली की झोपेच्या गोळ्या. सतरा, अठरा आहेत. सतरा अठरा!

आईला झोप यायची नाही. तेव्हापासून तिच्या नकळत जमवून ठेवल्यात. एक ना एक दिवस उपयोगाला येतील. मधूनमधून बाटली काढून पहातो. काय सांगू राव, हातात घेताच असा धीर येतो. भीती पार नाहीशी होते. बळ येतं. हाः हाः '!

आवश्यकता वाटली तर कळव. दोघांना पुरेशा आहेत. आणखीसुद्धा एखादा चालेल. खूप जण तयार होतील. मी फ्री देईन. फुक्कट !"

श्याम हसून म्हणाला, "मला गरज लागेल कधीतरी." गंभीर चेहऱ्याने 'बरं' म्हणून सुबोध निघून गेला.

अंगावर शाल टाकून सुबोध एकटा चालला होता. छायाप्रकाशातून, त्याने चोरून जमवलेल्या गोळ्यांच्या दिशेने. त्याला हाक मारायची इच्छा श्यामला होईना. त्याने त्याला तसेच जाऊ दिले.

## ( ११ )

दुपारीच श्याम घराबाहेर पडला. वरच्या पायरीवर त्याने सिगरेटचे पाकीट काढले. सिगरेटस् संपल्या होत्या. हातातले पाकीट त्याने टाकून दिले. डाव्या पायाने उडवले. ते रेलिंगला अडकले आणि जिना वळन होता तिथे मधल्या जागेत पडले. "गोल" तो पुटपुटला, हसला. थोडा वेळ रेलिंगवर रेलून तो पायऱ्या उतरला. जिन्याच्या मध्यभागी पडलेल्या पाकिटाला पायाने उडवीत उडवीत त्याने खाली आणले. "इन् आऊट, इन आऊट" तो म्हणत होता. त्या शब्दांनी अनेक स्मृती जाग्या झाल्या. अनेक गोष्टी-दृश्ये जागी झाली. कासवाच्या पाठीसारखे, टणक, हिरवे मैदान, एक बॉल आणि ते पळताहेत, पळताहेत. त्याला हसू आले.

मोठ्या रस्त्यावर येऊन त्याने एक्स्प्लेनेडची बस धरली.

ठरलेल्या जागी, दिव्याच्या खांबाशी श्याम उभा राहिला. त्याने गॉगल्स काढले. लीलाची मूर्ती अंधूक अंधूक दिसू लागली. पाणी संथ व्हावे. मग माशांची हालचाल जशी स्पष्ट दिसावी तशी लीलाची आकृती हळूहळू रेखीव दिसू लागली. तेच कामात

मग्न असलेले दोन गोरे हात, गोल, सुंदर चेहरा, कपाळाला स्पर्श करणारे केस. आज तिने पांढरा ब्लाऊज घातला होता. डोक्यावर उंच खोपा घातला होता.

लीला उभी राहिली. त्यांची नजरानजर झाली पण आज लीला बावरली नाही. तिने डोळे विस्फारले नाहीत. ओठ मात्र दाताखाली दाबले गेले. कपाळावर आठी पडली. झटक्यात तिने आपली नजर वळवली. ती कामात गढून गेली.

श्यामला कल्पना होती, असेच घडणार होते आणि असेच घडायला हवे होते. हसऱ्या चेहऱ्याने तो तिथेच उभा राहिला.

धूसर, अंधूक वातावरणात त्याचे पाय पुढे पडू लागले, रस्त्यावरच्या माणसांचे भान, वेळेचे भान लुप्त व्हायला लागले. फक्त आगगाडीचा आवाज ! हरणांच्या खुरांचे आवाज ! नि:शब्द वृष्टिपाताने छाती भरून यायला लागली. शरीरात आत मेघ गर्जायला लागले.

चौकोनी चेहऱ्याचा एक माणूस लीलाबरोबर बोलत होता. त्याने गरम पँट, पांढरा स्वेटर घातला होता. खूप संभावितासारखा हसत होता. पण त्याचा मतलब श्यामच्या लक्षात आला होता. लीलाला तो अनेक गोष्टी रंगवून सांगत होता. भुलवीत होता. लीलाचा चेहरा मृदू झाला होता. डोळे स्वप्नाळू झाले होते. नेहमी कामात मग्न असणारे तिचे हात कितीतरी वेळ काउंटरवर नुसतेच पडले होते.

लीलाच्या दबल्या ओठातून हर्षाचे हसू स्पष्ट दिसत होते. खोलीत तिसरे कोणीच नव्हते. टेलिफोनसुद्धा शांतच होता. कदाचित् वाजत असेल. लीला उत्तर मात्र देत नव्हती.

माणूस ओळखीचा असावा असे श्यामला वाटत होते. त्याने खूप वेळ निरखून पाहिले. श्याम ज्याचा पाठलाग करीत होता तोच बदमाष होता तो. तो इथं कसा आला ? श्यामला समजत नव्हते. असहायपणे तो मनातल्या मनात ओरडत होता.

"लीला, बोलू नकोस त्याच्याशी. त्याच्याशी काय बोलायचं ? तोंड फिरव अन् तुझ्या कामात गुंतून जा. केव्हापासून तुझा फोन वाजतोय. त्याला उत्तर दे. संध्याकाळ होतेय. तुझं काम संपव." मग त्याच्याकडे पाहून तो म्हणाला, "असं काय बच्चंमजी, तू इथं शिरलास ? लीला, तू टाकून बोल त्याला काहीतरी. त्याला घालवून दे. नाहीतर डोळ्याच्या इशाऱ्यानं मला बोलव. मी आत येऊन त्याला बाहेर काढीन. मी त्याला ओळखतो. तो गर्दीत लोकांच्या खिशांकडे पहातो. त्याचा वखवखलेला हात मुलींच्या छातीवरून फिरतो. तू त्याच्या बरोबर जास्त बोलू

नकोस. गप्प रहा. त्याच्याबरोबर कशाला बोलायचं. अग, एकजण तुझ्याकडं पहातोय. तुला माहीत नाही का ?"

रिंग वाजली असावी. लीलाने रिसीव्हर उचलला. पेन्सिल उचलून लिहायला लागली. मधूनच त्याच्याकडे पहात होती. तो काउंटरवर वाकला. रिसीव्हरच्या दिशेने त्याने हात पुढे केला. लीलाने मान हालवली. ती थोडी मागे सरली. हसली. " खेळतोय. " श्याम समजला. त्याच्याशरीरातून झिणझिण्या आल्या. "केवढं साहस ! तिच्या जवळ उभा राहून, तिच्याशी बोलून नुसत्या नजरेनं तिचं पातिव्रत्य नष्ट करून टाकलं. "

शिवाय आपण तिच्याकडं पहातोय हे लीलाला माहीत आहे, तरीसुद्धा त्याच्या वागण्याला ती हरकत घेत नाही ? का आपल्यावर ती सूड घेतेय ?

श्याम पुढे पुढे यायला लागला. आपण काय करतोय ते त्याला समजत नव्हते. दाराच्याजवळ येऊन तो उभा राहिला. त्याचा उभट, जीर्ण चेहरा काचेत दिसत होता. बावळ्या वेषाची छाया काचेत पडली होती. त्याच्या तोंडच्या वाफेने काचेवर अभ्रे धरली होती. डोळे रोखून तो आत पहाण्याचा प्रयत्न करीत होता.

रिसीव्हर ठेवून बसता बसता लीला दचकून उभी राहिली. हाताचा पंजा तोंडावर पडला. डोळे विस्फारून ती पहात राहिली. चौकोनी चेहऱ्याचा तो माणूस विद्युत-गतीने वळला. श्यामकडे पहाता पहाता त्याच्या मुठी वळल्या. पण कुंठित होऊन तो श्यामकडे पहात राहिला होता.

श्याम हसला. एक एक पाय मागे घेत तो परत पहिल्या जागी येऊन उभा राहिला. निश्चित मनाने. संथ दृष्टीने त्या त्रासलेल्या माणसाकडे पाहू लागला. नजरानजर झाली तसे तो म्हणाला, " सावधान, मी पहारा करतोय. "

त्या माणसाने नजर दुसरीकडे वळवली. लीला चेहरा खाली करून बसली होती. सुटाबुटातली दोन माणसे आत डोकावून गेली. लीलाच्या समोर येऊन काही बोलली. लीलाचा चेहरा लाल झाला होता. तिला सहजासहजी हसायला येत नव्हते. मान हलवून थांबून थांबून ती उत्तरे देत होती.

खोलीत ते दोघेच उरले. चौकोनी चेहऱ्याचा माणूस लीलाकडे वळून बोलला. लीलाने मान हलवली. त्याचा चेहरा हताश झालेला दिसला. त्याने इकडे तिकडे केले. मग काउंटरवर ठेवलेली बॅग घेऊन तो बाहेर पडला. त्याने श्यामकडे पाहिले. श्यामने लक्षच दिले नाही. तो निघून गेला.

श्याम उभाच राहिला.

चहूबाजूंनी अंधार व्हायला लागला. लीला खोलीत उजळून दिसत होती. छोटया मुलीसारखा तिचा चेहरा अभिमानी दिसत होता. श्यामचे ओठ हलले. " तुला त्यांच्यापैकी मानलं नव्हतं. एवढ्या गर्दीत, इतक्या लोकांसमोर तुला सांगू शकलो नाही. भिऊ नकोस. तुझ्यासाठीच एक दिवस मी पृथ्वीला निर्जन करून टाकीन. सगळ्या माणसांना शांत करून टाकीन. एका दाट जंगलात सगळं शहर बुडवून टाकीन. तू त्या लोकांबरोबर बोलतेस. कसले ते लोक ! निर्दय ! तसल्या निर्दय चेहऱ्यांचे लोक पृथ्वीवर जितके कमी असतील तितके चांगले ! तू कधीच तसल्या माणसांबरोबर जाऊ नकोस. "

काम संपले. लीलाने सावधपणे एकदा दाराकडे पाहिले. नंतर डायल फिरवली. मग नुसतीच बसून राहिली. खोलीत अनेकजण येजा करीत होते. श्याम त्यांच्याकडे पहात नव्हता. ती कोणाची तरी वाट पहातेय.

बराच वेळ कोणी आले नाही. लीला आत गेली. परत बाहेर आली. काउंटरवर ओठंगून, दाराकडे पाठ करून उभी राहिली. पुन्हा अस्वस्थ चित्ताने खोलीत फेऱ्या घालू लागली. दाराकडे येऊन उभी राहिली. तिच्यामागे प्रकाश पडला होता. त्या प्रकाशात लीला सावलीसारखी दिसत होती. काचेच्या खूप जवळ, चिकटून उभी राहिली. श्यामला स्पष्ट जाणवले, त्या अंधारातून दोन डोळे आपल्याकडे पहाताहेत. विचारताहेत, ' रस्त्यावरच्या माणसा, तुला काय हवंय ? अनोळख्या, तुला काय हवंय ? '

जणू काही दोन्ही प्रश्न त्याला ऐकू आले. त्याच क्षणी त्याचे शरीर कापू लागले. तो पुटपुटला, " मला माहीत नाही. मला काय हवंय ते मला माहीत नाही. मलाच माहीत नाही. "

श्यामने दृष्टी वळवली. डोळे खाली वळवून, अस्वस्थपणे तो उभा राहिला. दूरच्या वळणावरून मोटरसायकलचा आवाज ऐकू आला. मोटरसायकल त्याच्या मागेच फूटपाथला टेकून थांबली. मोटरसायकलवरून एक मुलगा उतरला. काचेच्या दाराकडे गेला. काळी पॅण्ट आणि पांढरा पुलओव्हर ! छोटे छोटे कापलेले केस ! वय लहान पण अंगकाठी मजबूत दिसत होती. मन्त्रवत त्याने दार उघडले.

तोच, पहिल्या दिवशी ऐकलेला गोड आवाज श्यामने परत ऐकला. लीला विचारीत होती, " इतका उशीर ? केव्हाची फोन करून वाट पहात बसलेय. "

" हा साला खडूस ट्रॅफिक ! वळून यावं लागलं. रस्ता क्लिअर मिळेना. का ? काय भानगड आहे ?"

" कुठंय? काही नाही. "

" काही नाही ?"

" ऊंहूं. "

दोघे श्यामच्या दिशेने निघाले. श्याम उभाच होता. लीला त्याच्या डाव्या बाजूला होती. श्याम त्याच बाजूला उभा होता. चालता चालता तिने कौशल्याने बाजू बदलली. ते दोघे त्याच्या अंगावरून गेले. श्यामने वळून पाहिले नाही. किक् मारल्याचा आवाज आला. नंतर मोटरसायकलचा गुरगुर आवाज ! मोटरसायकल निघून गेली. श्याम झाडासारखा निश्चल होता. हवेत पेट्रोलचा वास उधळला होता. त्यातच मिसळला होता गोड वास ! पावडरचा असावा. पूर्वी अनेक पावडरींचा वास श्यामच्या ओळखीचा होता. आता तो विसरून गेला होता. त्याने मान वळवली. छे ! हा वास त्याच्या ओळखीचा नव्हता.

तुला खूप प्रेमिक आहेत. ठीक. असू देत. पण लक्षात ठेव. एक दिवस पृथ्वी निर्जन होणार आहे. तेव्हा तुला लपायला जागा असणार नाही. पळून जायलासुद्धा रस्ता मिळणार नाही.

श्याम गर्दीतून रस्ता काढीत होता. चालता चालता स्वत:शी बोलत होता. 'त्या तसल्या चौकोनी चेहऱ्याच्या, कठोर स्वभावाच्या माणसांना कशी भीती दाखवायची ते मला माहीत आहे. मोटर सायकलवाल्यांना दूर कसं करावं तेही मी जाणतो. तू मला कोणालाच दाखवू नकोस. कुठल्या मुलाला हे सांगू नकोस. नाहीतर एकटं फिरणं मला कठीण होईल.'

चालता चालता तो मध्येच थांबला. मागून येणाऱ्याला त्याचा धक्का बसला.

खरं तर पृथ्वी निर्जन झालेलीच आहे. जिवंत माणसं श्यामच्या दृष्टीस पडेनात.

अनेक रस्त्यांवरून श्याम हिंडला. एकही ओळखीचा चेहरा दिसला नाही. जवळचा माणूस भेटला नाही. त्याच्या मनात आले, इतकी वर्षे आपल्याला झोप लागली होती. खूप वर्षांनी आपल्याला जाग आलीय. कोणीच ओळखता येत नाहीय. इतक्या वर्षांतल्या ओळखी विरघळून गेल्या. सर्व चेहरे विस्कळित झाले. चारी दिशांनी धुके दाटून आले आहे. दूरचे काही दिसेना. त्याला वाटले, धुके दूर होईल आणि अनोळखी प्रदेश दिसेल.

एका निर्जन रस्त्यावर लीला दिसेल. काचेच्या दाराला रेलून त्याची वाट पहात असेल. त्याला पाहून दार उघडून बाहेर येईल. मग त्या निर्जन रस्त्यावर दोघे खूप हिंडतील. परस्परांना स्पर्शही न करता.

एखाद्या घरात त्यांच्यासाठी सुंदर अंथरूण पसरलेले असेल. दुकानात वस्तू सजवून ठेवलेल्या असतील. एकदा स्पर्श केला की झाडांवर फुले येतील. फळे येतील. फक्त दोघांसाठीच सूर्याचे किरण पृथ्वीवर येतील. फक्त दोघांसाठीच पाऊस पडेल.

नाही. तसे होणार नाही. पृथ्वीवर हे काहीच घडणार नाही. पृथ्वी आता सुंदर नाही. आता ह्या पृथ्वीवर राहताहेत अहंकारी मोटरसायकलवाले आणि काही चौकोनी चेहऱ्याचे लोक !

हॉटेलमध्ये सुबोध दिसला नाही. श्यामला आश्चर्य वाटले. त्याला एकटे एकटे वाटू लागले. समोरच्या मोकळ्या खुर्चीकडे तो पहात होता. अनेक वेळा त्याचे मन शंकेने व्याकुळ झाले. खाण्यात गोडी वाटेना. तो खात राहिला.

हॉटेलच्या मॅनेजरबरोबर तो कधीच बोलला नव्हता. थुलथुलित शरीराचा, नम्र चेहऱ्याचा, किलकिल्या डोळ्यांचा मॅनेजर दाराजवळच्या टेबलाशी बसलेला असायचा. संध्याकाळी गांजा ओढल्यासारखा दिसायचा. थोडकेच बोलायचा. खूप हसायचा पण आवाज यायचा नाही. श्यामने त्याला हॉटेलमधल्या पोरांवर ओरडताना किंवा दम देताना कधीच पाहिले नव्हते. त्या पोरांवर दाब ठेवायला एक वेगळाच माणूस होता. मॅनेजर शांत चित्ताने बसलेला असे. श्याम पहात होता. दिवसेंदिवस मॅनेजर अधिकाधिक शांत होत चालला होता. चेहऱ्यावरच्या हास्यात नम्रता आणि उदासीनता उठून दिसायची. बोलणे आणखीनच कमी झाले होते.

मागच्या भिंतीवर त्याच्या मृत वडिलांचा फोटो टांगलेला होता. फोटोवर गेल्या वर्षीचा सुकलेला हार लोंबत होता. श्यामच्या मनात यायचे हा मॅनेजरसुद्धा एक दिवस आपल्या गादीवर आपल्या पोराला बसवील आणि आपण आपल्या बाबांच्या फोटोशेजारी जाऊन बसेल. मग त्या फोटोशेजारी सुकलेला हार लोंबणारा आणखी एक फोटो येईल.

नाहीतर जागेवर बसल्या बसल्याच त्याचा दगड होईल. सिमेंट काँक्रिटसारखा तो बसल्या जागीच घट्ट होईल. हालणार नाही. चालणार नाही.

श्याम त्या टेबलाशी उभा राहिला. दाराबाहेर पुष्कळ कुत्री गोळा झाली होती. रोजच जमायची. श्यामने कुत्री मोजली. अकरा भरली.

“इतकी कुत्री !” श्यामने मॅनेजरच्या तोंडाकडे पाहिले. “इतक्या कुत्र्यांना आपण रोज खायला घालता !”

“होय.” मॅनेजर नम्रपणे हसला. हसता हसता त्याचे डोळे मिटले.

“अकरा कुत्र्यांना !” मोठे मोठे डोळे करून श्यामने विचारले. “खूप पुण्य जमवलंत आपण. अगदी थोड्या काळात.”

मॅनेजरने घसा साफ केला, म्हणाला, “अकरा म्हणजे पुष्कळ ! हे कमीच आहेत.”

“कमी !”

“होय. दिवसेंदिवस वाढताहेत. आणखी वाढतील.” तो विषण्ण चेहऱ्याने म्हणाला.

“का ?”

“का ?” त्याने श्यामकडे चमत्कारिक नजरेने पाहिले. मग म्हणाला, “कुठं खायला मिळत नाही. ही देशाची परिस्थिती. म्हणून इथं गोळा झालीत.”

“हूं.” श्यामला मॅनेजरचे बोलणे ऐकावेसे वाटत होते. देशाच्या अन्नपरिस्थिती-बद्दल त्याने बऱ्याच दिवसांत काहीच ऐकले नव्हते.

“ही कुत्री दिसताहेत ती सर्व उकिरड्यावरची कुत्री नाहीत. नीट निरखून पहा. तो पांढरा कुत्रा दिसतोय ना ? अंगावर फोड आलेला, झुलणारे कान, तो स्पॅनियल आहे. क्रॉसब्रीड. जो कॉफी रंगाचा आहे तो ओळखता येणार नाही. तो बोसबाबूंचा अल्सेशिअन आहे. अंगावर क्षतं पडलीत. उकिरड्यावरचं कुत्रं झालंय.”

बोलणे संपेपर्यंत एका गिऱ्हाइकाला त्याने तिथेच उभे केले होते. त्याला पैसे मोजून दिले. बाकीचे टेबलाच्या खणात टाकले.

“सुबोध आज दिसला नाही ? सुबोध मित्र ?” श्यामने विचारले.

तो त्रयस्थपणे हसला. मान हालवून म्हणाला, “अजून आला नाही.” एवढे बोलून तो कुत्र्यांकडे पहात राहिला. ते प्राणीसुद्धा त्या शांत चेहऱ्याच्या माणसाकडे प्रेमाने पहात होते.

श्याम काही न बोलता बाहेर पडला. कुत्र्यांमधून मार्ग काढीत तो रस्त्यावर आला. स्पॅनिअल कुत्र्याकडे तो आश्चर्याने पहात राहिला. “दरिद्री” श्यामने त्याला मनातल्या मनात शिवी हासडली.

श्यामला एक शंका आली. विजेसारखी ती शंका त्याच्या डोक्यात चमकून गेली. सुबोधचे घर जवळच होते. मनात आणले असते तर तो जाऊ शकला असता. पण त्याला जावेसे वाटेना. तसेच काही घडले असेल तर तिथे जाण्यात काय फायदा ? शिवाय तिथे गेले की पोलिसांच्या चक्रात अडकणार. त्याचे शरीर भयंकर जड झाले. तो वाटेत थांबला. त्याला जांभई आली.

घडणारच होते तर सांगितले असते. कोणतीही गोष्ट तो श्यामला सांगितल्याशिवाय राहात नाही. सतरातल्या अर्ध्या गोळ्या तो श्यामला देणार होता.

श्याम मध्येच उभा राहिला. त्याला किती गोळ्या मिळणार होत्या ? तो हिशोब करायला लागला. आठ की नऊ? अर्ध्या देईन म्हणाला. पण नेमका आकडा नाही सांगितला सुबोधने ! श्यामने गणित करून पाहिले. आणखी एकाला सामील करून घेतलं तरी बरोबर तीन भाग करता येणार नाहीत. श्याम बुचकळ्यात पडला. शेवटी त्याने निर्णय काढला की सतरा ही संख्या वाटे करण्याच्या बाबतीत अगदीच निरुपयोगी आहे. तो चालायला लागला.

पृथ्वी निर्जन झाली आहे. क्रमाक्रमाने होत जाणार आहे. सर्व काही त्याच्या एकट्यासाठी असणार आहे. सुबोधपासून सुरुवात झालीय. छे. सुरुवात तर कधीचीच झालीय.

मोटरसायकलचा विसरलेला आवाज त्याच्या डोक्यात पुन्हा सुरू झाला. मृत्युगोलातला आवाज त्याच्या जवळ जवळ येऊ लागला.

श्याम भराभर पावले उचलू लागला.

## ( १२ )

कदाचित् पृथ्वीवर एक खूप सुंदर काळ येऊन गेला असेल. तेव्हा श्याम नव्हता. कदाचित् ह्यापुढेसुद्धा येईल. तेव्हा श्याम असणार नाही. केव्हा येणार आहेत ते सुंदर दिवस ? श्यामला माहीत नाही. पक्ष्याच्या चोचीतून पडणारे बी पाहून इथेच

पीक येणार हे जसे सांगता येते, आकाशातले मेघ पाहून अमक्या शेतात वृष्टी होणार हे जसे सांगता येईल तशी भविष्यकालाची चिन्हे कुठे दिसताहेत का हे श्याम पहात होता. कोण जाणे, कदाचित् आपण जगतो आहोत तोच काळ सर्वांत सुंदर कशावरून नसेल ?

दुपारचे ऊन डोक्यावर घेत श्याम त्याच्या ठराविक खांबाशी येऊन उभा राहिला. त्याला वाटले, हे सगळे सगळे खोटे आहे. लोक सावलीसारखे सरकत आहेत. समोरचा काचेचा दरवाजा सोडला तर सारे असत्य आहे. त्या दाराजवळ लीला बसली आहे. तिचे दोन्ही गोरे हात कामात गढलेत. चेहरा गंभीर आहे. उदास आहे.

लीलाच्या मनात ह्या वेळी कुठलाच विचार नसेल. तिचे मन विशाल झाले असेल. आघात करायच्या आधी सावध व्हायला तिला वेळ द्यायला हवा. श्याम जाणून होता. लवकरच रस्त्यावरचे लोक आपल्याला घेरतील. दूर जायला सांगतील. जोपर्यंत ही घटना घडणार नाही तोपर्यंत दिवस खूप सुंदर असतील. साऱ्या दिवसांमधले देखणे दिवस !

त्यानंतर एक दिवस आपण इरफानकडे जाऊ. त्याला सांगू, " मला पाकिस्तानात जायचंय. सीमा पार करून दे. " नाहीतर त्या सतरा गोळ्या जमा करायचा आपण प्रयत्न करू. त्या हातात घेताच आत्मविश्वास येईल. उशीजवळ नेल्या की भीती जाईल. भविष्याची काळजी जाईल.

काय करायचे आहे हे त्यालाच समजत नव्हते. वाटत होते, हाच काळ पृथ्वीवरचा सर्वात सुंदर काळ असेल !

आजही लीला काचेच्या दाराशी येऊन कितीतरी वेळ सावलीसारखी नुसती उभीच राहिली. द्विधा मन:स्थितीत. नंतर श्यामकडे आपादमस्तक पाहून तिने दार उघडले. ती हळहळू एकटीच चालू लागली.

श्यामचा विश्वास बसेना. ती लीलाच होती. एकटी चालली होती. तिच्या हेलकावे खाणाऱ्या शरीराकडे श्याम पहात होता. त्याचे शरीर थरारले. काहीतरी गूढ असे आत आत वाटायला लागले. त्याला वाटले खूप जोराने हसावे. गुडघे टेकून रडावे. 'तू लीला आहेस. तू एकटी माझ्याबरोबर एकाच मार्गावरून चल.' पायात डोळे जडवून, स्वत:ला लपवीत लपवीत श्याम त्या गर्दीतून निघाला.

गर्द बदामी रंगावर मोठमोठ्या छापांचे नक्षीकाम केलेली साडी लीला नेसली होती. केसांची वेणी घातली होती. पाठमोरी लीला पवित्र दिसत होती. ती

मंदमंद पावले उचलीत चालली होती. तिने दोन्ही हात छातीवर आडवे धरले होते पांढरी पर्स तिने छातीशी धरली असावी. गळ्याला बांधलेल्या काश्मिरी स्कार्फचे टोक वाऱ्यावर उडत होते.

खूप गर्दी होती. तरी श्यामच्या ते गावी नव्हते. लीला मान वळवून त्याच्या नजरेला नजर देऊ शकत होती. त्याच्या छातीत असंख्य हरणे उड्या मारीत होती. शरीरात मेघांच्या गर्जना होत होत्या. पाऊस कोसळत होता. एके काळी आगगाडी एक मोठा पूल ओलांडीत होती. नजरानजर झाली तर ? नजरानजर झाली, लीलेने पाहिले, प्रश्न विचारला, "तू कोण ?" तर ?

श्यामचे हातपाय आखडले. तो चालत होता. काय होईल ? भयंकर उलथापालथ होईल. अदृश्य मेघांतून पाण्याच्या धारा वहायला लागतील. आपण स्वतःला विसरून जाऊ. धडा विसरणाऱ्या मुलासारखे. गोंधळून लीलासमोर उभे राहू. तिला म्हणू. "मला प्रश्न विचारू नकोस. मला उत्तर माहीत नाही."

समोरच्या वळणावर रस्ता पार करून जाण्यासाठी गर्दी जमली होती. पोलिसच्या हाताने अनेक गाड्या अडवल्या होत्या. लीला परत चालायला लागली. रस्ता ओलांडून गेली.

ती सावकाश चालत होती. घाईने चालणे तिला कधीच जमले नसावे. चारी बाजूंना अवास्तव छायेसारखी माणसे. त्यांच्यापैकी कोणालाच श्याम ओळखीत नव्हता. ही खरोखरीच माणसे आहेत का हेमुद्धा त्याला माहीत नव्हते. आपण केवळ छायांमधून चाललोत असेच त्याला वाटत होते.

"वा, मस्त !" बसस्टॉपवर लीलाला उद्देशून कोणी म्हणाला. श्यामने गुरकावून पाहिले. पुटपुटला, "काय वाटलंय ? मी पहारा करतोय." हसला. आज त्याला जिवंत असल्यासारखे वाटत होते. हृदयात धडधडत होते, कारखाना चालल्यासारखे ! सुंदर ! पृथ्वीवरचे लोभस युग हेच असेल !

लीलाची गती अधिकच मंद मंद होत चालली होती. फूटपाथच्या कडेने शोकेस-कडे तोंड वळवून ती चालली होती. चालता चालता थांबायची. वस्तू पहायची, चालायला लागायची. त्याला वाटत होते तेवढी लीला बेसावध नव्हती. तिचे शरीर सावध होते, कान चलाख होते. श्याम आपल्या मागून येतोय ह्याची तिला खात्री होती.

मोकळ्या रस्त्यावर एकटी लीला, आपल्याशी बोलत असेल का ? कोण जाणे ! काय म्हणत असेल ? 'जवळ ये. तुझा चेहरा चांगला पाहू दे. तू कोण आहेस ? हिंदू ? तुझे गोत्र काय ? तुझे नाव, तुझे वय ? नातेवाईक ? सर्वांबद्दल मला सांग. तुला भाऊ-बहिणी किती आहेत ? आणि तुझी नोकरी ?

सगळेच प्रश्न महत्त्वाचे होते. ते जाणून घेणे लीलाला आवश्यक होते. मनातल्या मनात श्याम तिच्या प्रश्नांना उत्तरे देत होता. "श्याम चक्रवर्ती माझं नाव. कमलाक्ष चक्रवर्ती माझे वडील. आमचं गोत्र शाण्डिल्य. विक्रमपूरच्या बानिखाडा गावात आमचं घर आहे. मला भाऊ नाही. एक बहीण आहे. तिला मुर्शिदाबादला दिलंय. तिच्याबद्दल काही माहिती नाही. सेंट अँड मिलरमध्ये मी छोटा साहेब होतो. बॉस 'बॅस्टर्ड' म्हणाला. मी नोकरी सोडून दिली. खरंच सांगतो, तेव्हापासून 'मी कोण ?' मलाच माहीत नाही."

लीला हळूहळू चालत होती, ती एका दुकानासमोर उभी राहिली. शोकेस पाहून पुढे निघाली. लंपट माणसे तिच्या अंगाला घसटून जात होती. ती लीण्डसे स्ट्रीट-पर्यंत आली. रस्ता तिथून रुंद झाला होता. रस्ता ओलांडायच्या आधी तिने मागे वळून पाहिले. डोळ्यात अवहेलना होती. तिने क्षणात दृष्टी फिरवली. ती नजर त्याच्या छातीत काट्यासारखी घुसली. त्याचे हृदय तडफडले. श्वास गुदमरला. पाण्यात गुदमरावा तसा !

निःशब्द वातावरणातून त्याने जणू काही लीलाचे शब्द ऐकले. 'जवळ ये.'

"नाही," त्याने मान हलवली, "मला माहीत आहे. तुझ्याजवळ यायचा प्रयत्न केला तर चारी बाजूंची घरं थरकापून उठतील. झाडं मुळापासून उखडून येतील. वारा आर्त स्वरानं ओरडेल, "वाचवा, वचावा."

"पण नको, ह्या वेळी नकोच. परत कधीतरी पृथ्वी सुंदर होईल त्या वेळी तू मला पहा. एवढ्या गर्दीत, एवढ्या लोकांमध्ये नको. एक दिवस—फार दिवस नाहीत मी ह्या पृथ्वीवर सुंदर दिवस आणणार आहे."

निःशब्द लीलाचा आवाज आला, "काहीतरी बोल."

"नाही. आता नाही. तुझ्याशी बोलण्यासाठीच मी एक भाषा तयार करणार आहे. त्या भाषेत कठोर शब्द असणार नाहीत. खोटं, अश्लील काही असणार नाही. शिव्या असणार नाहीत. ह्या माणसांची भाषा तेवढी सुंदर नाही. ह्या भाषेत तुला

समजायचे अजून खूप शब्द राहिलेत. रहस्य, राग, द्वेष, अवहेलना वाढविणारे. तू आधी ते सर्व शब्द विसरून जा. मग.........

लीलाने रस्ता ओलांडला नाही. डाव्या वळणावर ती वळली. काही पावले जाऊन, एका घराच्या उघडया दारासमोर ती उभी राहिली. त्रासलेल्या नजरेने तिने चारी दिशांना पाहिले. ती आत गेली.

श्याम त्याच दारासमोर येऊन उभा राहिला. आत एक जिना दिसत होता. बोटीच्या शिडीसारख्या चकचकित पायऱ्या होत्या. रेलिंग, सुखावणारा प्रकाश, लीला शिडीवर नव्हती. नवीन रंगाचा वास येत होता. आणि खूप मुलायम असा पावडरचा वास !

हे रेस्टॉरंट ? मागे येऊन श्यामने दारावर पाहिले. रेस्टॉरंट. वर बोर्ड होता. लीलाची वाट पहात इथं कोणीतरी थांबलंय. कोण असेल ? जवळपास एखादी मोटरसायकल उभी केलीय की काय ते श्यामने पाहिले.

तो संकोचला नाही. जिना चढू लागला. दिवाणखान्यासारखा मोठा हॉल होता. तिथल्या झगमगाटाने श्यामचे डोळे दिपून गेले. ग्लासेस, चमचे, टेबलाची काच ह्यांवरून येणारे प्रकाशाचे किरण त्याच्या डोळ्यात टाचण्यांसारखे घुसत होते. रूक्ष चेहऱ्याने गबाळ्या पोशाखात तो तिथेच उभा होता.

त्याला लीला दिसली. रेस्टॉरंट जवळजवळ रिकामे होते. दूरच्या टेबलावर लीला बसली होती. अधोमुख टेबलावरच्या काचेत तिला तिचा चेहरा दिसू शकत होता. ती एकटी नव्हती. सुंदर चेहऱ्याचा एक तरुण तिच्यासमोर बसला होता.

अरुण की काय ? श्यामने डोळे बारीक करून पाहिले. अरुणच !

अरुणने त्याला पाहिले. त्याच्या डोळ्यांत प्रश्नचिन्ह होते. कपाळावर आठी पडली होती. थोडा वेळ तोंड वासलेले राहिले. अरुणने चेहरा असा का करावा ? श्यामला कळेना. हसऱ्या चेहऱ्याने तो अरुणकडे पहात राहिला.

अरुणच्या तोंडातून हाक बाहेर पडली, "श्याम." आणि खूप वेळाने त्याचा चेहरा हसरा झाला. श्यामला आश्चर्य वाटले. लीलाने त्याच्याकडे वळूनही पाहिले नाही.

अरुणच्या हाकेकडे श्यामने लक्ष दिले नाही. मधली तीन टेबले सोडून तो बसला. एकटा. म्हाताऱ्या बेअराला त्याने एक कप चहा आणायला सांगितले.

डोळ्याच्या कोपऱ्यातून श्याम अरुणकडे पहात होता. अरुणचा चेहरा लाल दिसत होता. लाजरा, भित्रा दिसत होता. श्यामला नवल वाटले. दुसऱ्या एखाद्या माणसाऐवजी लीलाबरोबर अरुण दिसला म्हणून श्यामला बरे वाटले. अरुण जोपर्यंत जवळ आहे तोपर्यंत लीलाला भीती नाही.

अरुण बोलत नव्हता. काट्याने एक मोठा बटाट्याचा तुकडा काढून त्याने तोंडात खुपसला. काट्याचा खण् आवाज आला. अकारण त्याने रुमालाने चेहरा पुसला. त्याची नजर लीलाच्या चेहऱ्यावरून समोरच्या भिंतीवर फिरू लागली. सुंदर चेहऱ्याची. सुंदर पोशाखातली अरुणची आकृती त्याच्या बसण्याच्या तऱ्हेशी विशोभित होती.

लीला खूप सहज बसली होती. अरुणकडे पहात होती. चेहऱ्यावर हसू होते. कौतुक होते. एकदम पक्ष्यासारख्या मंजुळ आवाजात तिने विचारले,

"आपण मला बोलावलं होतं?"

"हो." अरुणचा चेहरा अस्वस्थ होता.

"मी आलेय."

अगदी मृदू आवाजात अरुण काही बोलला. श्यामला ऐकू गेले नाही. लीलाने नुसती मान हालवली. नकारार्थी.

लीला कोणासाठी आली होती ते श्यामला समजले. लीला शांत, नि:शंक वाटली. कोणीतरी समर्थ व्यक्ती आपल्या रक्षणासाठी आहे असा विश्वास तिच्या चेहऱ्यावर दिसत होता. श्याम अरुणकडे पहात होता. शुष्क ओठांवरून अरुण जीभ फिरवीत होता. श्यामला हसू आले. समोर त्याचा चहा आला होता.

ती दोघे काहीच बोलत नव्हती. नुसतेच बसून होते. लीलाच्या समोर पदार्थ तसेच पडून होते. श्यामला आश्चर्य वाटत होते. आपण इतके जवळ बसलोत. लीलाला ठाऊक नाही का?

लीलाला माहीत होते. थोड्याच वेळात श्यामला त्याची प्रचीती आली. उजव्या हाताने लीलाने वेणी पुढे घेतली. अरुणच्या नकळत मान वळवून तिने सरळ श्यामकडे पाहिले. म्हणजे श्याम कुठे बसलाय ते तिला माहीत होते. त्याशिवाय एकदाही इकडे तिकडे न पहाता तिने सरळ श्यामच्या दिशेनेच कशी मान वळवली?

त्याच्या नजरेत लीलाची नजर मिसळली. श्याम चमकला. लीला पुसटशी हसली.

लगेच तिने आपले हसू ओठाखाली दाबले. बोटाने दाखवावे तसा डोळ्यांनीच तिने अरुणला इशारा केला. निःशब्द वातावरणात हे घडून गेले.

लीला आज इतक्या दूरवर का आली ते श्यामच्या लक्षात आले होते. आपल्या-मागोमाग तिने त्याला इथपर्यंत आणले होते. मान वळवून न पहातासुद्धा तिला माहीत होते, श्याम आपल्या खूप जवळ बसलाय. श्यामला मनापासून वाटत होते संकटात आपणच तिचे रक्षण करणार आहोत. ती जणूकाही नजरेने आपल्याला विनवते आहे, " ह्या लोकांपासून माझं रक्षण कर. '

आत आत श्यामला एक विचित्र, बर्फासारखी ताठरता जाणवली. त्याचे शरीर पोलादासारखे झाले. मुठी आवळल्या गेल्या. अरुणकडे पहाता पहाता त्याचे रक्त विजेच्या प्रवाहासारखे वहायला लागले.

अरुण अगदी हळू बोलत होता. लीला मान हालवीत होती. ' नाही, नाही, नाही. "

काही वेळ असेच चालले. श्याम नुसताच बसून होता. वाट पहात होता. त्याच्या डोक्यातल्या सगळ्या जाणिवा लुप्त व्हायला लागल्या होत्या. संताप जमायला लागला होता धुक्यासारखा !

बिल देऊन अरुण उठला. लीलाने पर्स उचलली. ते दोघे निघाले. पुढे लीला. श्यामला जाणवले. लीलाने जाता जाता त्याच्या टेबलाकडे एक नजर टाकली होती.

अरुण त्याच्याकडे पाहून हसला. ते हसणे मनापासून नव्हते. त्यात प्राण नव्हता. त्याने हाक मारली, " श्याम—" मग थोडासा गडबडला. म्हणाला, " मागून बोलू. "

लीलाने परत पाहिले नाही. त्याच्याकडेसुद्धा नाही.

ते खाली गेले. श्याम उभा राहिला. ट्रे घेऊन भराभर म्हातारा बेअरा आला. श्यामने खिशात हात घातला. जेवढे सुटे पैसे हातात आले तेवढे त्याने त्याच्या ट्रेमध्ये टाकले. परत वळून पाहिले नाही. खाली आला. कुठेच कोणी दिसत नव्हते. श्यामने शोधाशोध केली नाही. निश्चित मनाने तो बस स्टॉपकडे आला.

हॉटेलमध्ये शिरताच भूत दिसल्यासारखा श्याम हबकला. सुबोध मित्र !

खूप वर्षांच्या जुन्या मित्रासारखा सुबोध हसला.

" काल आला नाहीस ?"

" नाही. काल एका नवऱ्या मुलाबरोबर गेलो होतो. " दोघे समोरासमोर बसले.

"राव, काल एक नवल पाहिलं. पुटियारला गेलो होतो. नवऱ्यामुलाचा मित्र म्हणून ! कलकत्त्याच्या दक्षिणेला की पश्चिमेला ते समजलं नाही. टॉलिगंज ओलांडून जावं लागतं. ही सगळी गावं, गंज काही वर्षांपूर्वी होती. तिथं गेल्यावर समजलं. ते कलकत्ताच ! हा हा ! कुठेही जा, कितीही दूर जा, जिकडे जाल तिकडे कलकत्ता ! कलकत्त्याला अंत नाही. उड्या मारीत मारीत शहर वाढतच चाललंय. गाव, वाडी, शेत कुठेही जा. सगळ्यावर स्टँप मारलाय, 'कलकत्ता वाढता, वाढता जगच कलकत्तामय झालं नाही म्हणजे मिळवली ! कलकत्ता : किती वाढतंय हे तुला इथं राहून समजणार नाही. चारी दिशांनी वाढत चाललंय. ह्यामुळं कलकत्त्याच्या बाहेर जायचा प्रयत्न केला तरी जमणार नाही. सगळेच चमत्कारिक दिसेल. पहाडावर जाल तरी ते कलकत्ताच असेल, समुद्रात जाल तरी कलकत्ताच ! लोक कलकत्त्यात जन्मून सगळं आयुष्य कलकत्त्यातच घालवतील आणि इथंच मरतील. हा ! हा !

जेवण झाल्यावर दोघे एकदम बाहेर पडले. आज हॉटेलच्या दारात पंधरा कुत्री होती. "कुत्र्यांची संख्या वाढतेय. पाहिलंस ?"

"हूं, आपला मॅनेजर कुत्र्यांचा भक्त आहे. रोज महाभारत वाचीत असावा." हसत हसत सुबोध म्हणाला.

सुबोधला गडियाबाजारशी सोडून श्याम घराकडे वळला. लांबूनच त्याला दिसले, घरासमोरच्या फूटपाथवर अरुण उभा होता. त्याच्या टायची गाठ सैल झाली होती. सूर्याच्या मृदू किरणात त्याचा चेहरा लाल दिसत होता. डोळे तारवटले होते.

"अरे श्याम," अरुणने हात पुढे केला. त्याचे पाय डळमळत होते.

"तुझ्याशी बोलायचंय."

श्यामने त्याचा हात हातात घेतला नाही. स्थिर नजरेने त्याच्याकडे पाहिले. अंतर्यामी त्याला बर्फासारखे गोठलेले भाव जाणवले. थंड आवाजात म्हणाला, "ये."

ओळखीचा गंध आला. डळमळणाऱ्या पावलांनी अरुण त्याच्यामागे आला. "श्याम, मला फार ताप होतोय. मी आणखी सहन करू शकणार नाही." ओळखीचा वास. खूप दुरून, अनंतापलीकडून येतोय. तो जिना चढून वर आला. मागून अरुण आला.

धापा टाकीत अरुण बिछान्यावर बसला. उशी घेऊन आडवा झाला. त्याच्या

सुटाची घडी विस्कटली होती पण अरुणचे तिकडे लक्ष नव्हते. म्हणाला, " तू पहातोच आहेस. तुला सगळं समजतंय साल्या........"

बोलता बोलता त्याची नजर हरवली.

श्यामने खुर्ची खिडकीशी ओढून घेतली. त्यावर एक पाय ठेवून तो उभा राहिला.

आपण काय सांगत होतो ते अरुण विसरला. मग म्हणाला, " तुला मागं म्हणालो होतो ना, माझ्या सासऱ्याकडे घेऊन जाईन म्हणून, ते काम करून टाकू. काळजी करू नकोस. मी परदेशात जायच्या आधी तुझं काम होऊन जाईल. " अरुण हसला. मूर्खासारखा. अर्थहीन.

" मी अनेक गोष्टी करू शकतो. काय समजलास ? साल्या, मी पुष्कळ काही करू शकतो. " बोलता बोलता त्याने डोळे मिटले. उन्मळून यायच्या आधी शरीर जसे थरथरावे तसे त्याला झाले. चेहरा लाल झाला. त्याने स्वत:ला सावरले. धापा टाकीत म्हणाला,

" काय सांगू, ह्या म्हाताऱ्याला मी घाबरतो. त्या थेरड्यानं माझ्या हातातलं, मुठीतलं सगळं हिरावून घेतलंय. मनात आलं तर तो मला माकडासारखं नाचवू शकतो. साला हरामी." बोलता बोलता त्याने स्वत:ला परत सावरले,

" माझ्या पाळतीवर लोक ठेवतो साला. गुंडांकडून धमकी दिलीय थेरड्यानं, मारण्याची !"

" कोणी ?"

" बायकोचा बाप, साला सासरा माझा. साल्याला एका सुंदर पोरीला जन्म देता आला नाही. तरी साला सासरा झाला. माझा सासरा. अरे तुला सांगून कल्पना यायची नाही. माझी बायको इतकी कुरूप आहे की खोलीत असली तर काळोख पडलाय असं वाटेल. शिवाय मी ' इन टाइम ' घरी परतलंच पाहिजे. नाही आलो तर मी कॅरेक्टरलेस ! तिनं कधी व्यभिचारी बनायचं ठरवलं तरी. . . . "

त्याने डोके खाली वळवले. उचकी लागावी तसे शरीर गचके खात होते. आणि एकदम गढूळ पाण्याच्या धारा अरुणच्या तोंडातून त्याच्या कॉलरवर, कॉलरवरून श्यामच्या टेबलावर पडल्या. ओकारीचा वास घरात भरून राहिला. श्याम काही बोलला नाही. एकटक अरुणकडे पहात राहिला.

हळहळू अरुण भानावर आला. संकोच न बाळगता त्याने उशीवरचा मळका टॉवेल घेतला. तोंड पुसले. खचलेल्या चेहऱ्याने त्याने श्यामपुढे हात केला, "सिगरेट?"

सिगरेटचे पाकीट आणि काडेपेटी श्यामने त्याच्यासाठी बिछान्यावर टाकली. अरुणने झेलली. काडी ओढताना एक ठिणगी बिछान्यावर पडली.

"माझ्या शरीरात साला वाघ फिरतोय, तरीसुद्धा मी इनटाईम घरी परतायला हवं. घरी आलं की ती कुरूप बायको! सौंदर्याचा मागमूस नाही. डायट कन्ट्रोल नाही. स्थूल, ढेपशी! हूं, अमेरिका!"

अरुणने उशीत डोके खुपसले. काही वेळ स्वप्नात असल्यासारखा तो हसला. डोके वर उचलले आणि अपरिचितासारखे कपाळाला आठ्या घालून श्यामकडे, पाहिले.

"श्याम–"

एवढेच बोलून तो गप्प बसला. काय बोलायचे होते ते जणू तो विसरून गेला.

"तुला कल्पना नाही. माझा पाठलाग करताहेत लोक. माझी बित्तंबातमी थेरड्याला कळवतात साले. मी किती रेस्टॉरंटस् बदलून पाहिली. पोरींना घेऊन कुठल्या कुठल्या गल्लीबोळात गेलो. किती अपरिचित ठिकाणी गेलो. पण कुठूनही मी पळून जाऊ शकत नाही. लपू शकत नाही.

म्हातारा मला समोर उभं करतो आणि माझ्या सगळ्या दिवसाचा रिपोर्ट मलाच देतो. नोकरांसारखं वागवतो. लहान मुलासारख्या धमकावण्या देतो. मी जे करतो त्याचा त्याला सुगावा लागतो.

पहारेकरी साला! फक्त एकदाच मला पळून जायची संधी मिळू दे, हातापायाने शाबूत. मग बघ, जेटमधून थेट अमेरिका, भुर्रऽऽऽऽऽऽऽ––

ज्या हाताने विमानाचे हावभाव केले त्याच हाताने गळा दाबून म्हणाला, "पण कोणीतरी जाऊन सांगेल. मी साला कोणालाही पकडू शकत नाही. रस्त्यात चालत असलो, हॉटेलमध्ये बसलो असलो, बारमध्ये असलो तरी ह्याला समजतं. पाठीला डोळे आलेत जसे. कोण जाऊन सांगतं? कोण? तुला ठाऊक नाही. अमेरिकेहून अर्ध्या रस्त्यातूनसुद्धा हा म्हातारा मला परत आणील. मनात आलं तर माझ्या करिअरचे तीन तेरा वाजवून टाकील. पोरीच्या नावावर साल्यानं तीन घरं बांधलीत. दोन लाख रुपये ठेवलेत. मी फार बडा आहे साल्या––––

त्याला वाटलं तर माझं हवेत रूपांतर करून टाकील. माझ्या शरीरात चित्ते–वाघ फिरताहेत. सुंदर पोरींसाठी, केवळ सुंदर पोरींसाठी मी साल्या – – – –"

अरुणच्या डोळ्यातून अश्रू वाहायला लागले. शब्द गोठले. फक्त ओठ हालत होते. श्यामकडे पाहून म्हणाला, "तू आज मला पाहिलंस ?"

"हूं."

"तुला पाहून मी चमकलो. खूप दिवस तुझी चौकशी केली नव्हती. इथं काय करतोस ते काही केल्या समजेना. त्या दिवशी तुझ्याजवळ खूप बोललो होतो. तुला पाहून आज वाटलं, माझ्या सासऱ्याच्या 'त्या' लोकांपैकी तर तू नाहीस ना ? तू एखाद्या उर्मट, गर्विष्ठ माणसासारखा वाटलास."

श्याम बोलला नाही.

हळूहळू अरुणच्या चेहऱ्यावरचं हसू मावळत गेलं. भिकाऱ्यासारखा लाचार स्वरात म्हणाला, "मी तुझ्यासाठी सर्व काही करीन. मी अनेक गोष्टी करू शकतो. माझी पळून जायची इच्छा आहे. एकदा जरी संधी मिळाली तरी फिरून येणार नाही. तीच कुरूप बायको, तो हराम थेरडा आणि हा दरिद्री देश सोडून पळून जावंसं वाटतं. मी पुन्हा मोठा माणूस होईन."

अरुणने असहायतेने चारी दिशांना पाहिले. ओठांवरून जीभ फिरवली. "आताच माझा शेवट होईल. अजून माझं वय झालं नाही. पण सगळा घोटाळा होईल श्याम, जरी तू एकदा थरड्याला फोन करून सांगितलंस की अरुण आज संध्याकाळी लीला-बरोबर होता........."

अकस्मात् श्यामच्या छातीत धडधड सुरू झाली. ढगांचा आवाज ! विजांचा कडकडाट ! आणि काळी आगगाडी लांबलचक पूल ओलांडतेय. धाड्धाड्, धाड्धाड् ! त्याने शांतपणे विचारले,

"तू लीलाला कधी स्पर्श केलायस ?"

"आं ?" अरुण अर्थहीन त्याच्याकडे पहात राहिला. म्हणाला, "नाही." डांबरटासारखा हसला. मग म्हणाला, " शी इज इन लव्ह. तुझी ओळख करून देईन म्हणालो होतो ना ? बोलायचंय ?"

"आज संध्याकाळी काय काय झालं ?" श्यामने परत विचारले.

"नथिंग !" अरुण हसला "आम्ही भावाबहिणींसारखे आहोत." त्याने दीर्घ निःश्वास सोडला.

" आजची पहिली 'अपॉइन्टमेन्ट' होती. तिला म्हणालो, 'गर्दीतून जाऊ या. एखाद्या एकांत जागी."

ती म्हणाली, " नको."

" टॅक्सीतून हिंडू या?"

" नको."

विचारलं, " रात्री एकटं वाटतं?"

रागावली.

बोलता बोलता उचकी देऊन अरुण हसला. "असल्या पोरी अजून 'लहान' असतात. शिवाय 'एक्स्पेरियन्स' " नंतर समजतं. 'एंगेज्ड' आहे. पण मी 'अंबिका हलदार'चा जावई. मला नकार देणं तिला जमेना, म्हणून आली होती. " अरुणचे डोळे, चेहरा भयंकर त्रासिक झाला. म्हणाला, " चल साल्या, हिच्यापेक्षा मिस दत्त खूप चांगली."

अरुण उठला. स्वत:च केलेल्या ओकारीवर त्याचा पाय पडला. " श्याम, म्हाताऱ्याला कळलं तर? साल्या तुझे डोळे सांगतहेत, बोल, आमच्या मागोमाग त्या रेस्टॉरंटमध्ये येऊन काय मिळवलंस? साल्या, तुलाच तर नाही माझ्या सासऱ्यानं पाळतीवर ठेवलं? माझ्या? आं?"

श्याम काहीच बोलला नाही. त्याला बोलायची इच्छाच नव्हती. शेवटी अरुणच्या डोक्यावरचा भार अरुणलाच वाहायला हवा होता.

ओकारीवर पडलेला पाय अरुणने एकदा झटकला, दरवाजाकडे जाता जाता तो हसून म्हणाला, " टू अमेरिका जायेंगे!" त्याने हात हलवला.

दारापर्यंत उलटीवर पडलेल्या त्याच्या पावलांची चिन्हे उमटली होती. श्यामने खिडकीतून पाहिले. अरुण फूटपाथवर उभा होता. त्याच्याकडे पाहून 'बाय बाय' करीत होता.

श्यामने तोंड वळवले. श्यामला खात्री होती अरुण त्याच्या ठीक जागी पोचणार आहे. आज घडलेले तो उद्या विसरून जाणार आहे. ह्याप्रमाणे रोजच तो आदल्या दिवशी घडलेले विसरणार आहे. पुढे पुढेच जात राहाणार आहे. त्याच्या इच्छित स्थळी पोचणार आहे. टेबलाकडे पाहून त्याला अकारण हसू आले. खूप दिवसांनी आज त्याच्या मनात आले. " आपण घर स्वच्छ करावं."

( १३ )

हूं ! आजच्या पेपरमध्ये एक बातमी आलीय. श्यामला आधी काही उमगेना. मग लक्षात आले, हीच ती बातमी !

स्वत:च्या डोळ्यांवर त्याचा विश्वास बसेना. मग प्रकाश पडला, "गोष्ट घडून गेलेली आहे. सत्य प्रसंग !"

काही दिवसांपूर्वी दक्षिण कलकत्त्यात मोटरसायकलचा अपघात झाला होता. त्यात जखमी झालेले श्री. गौर भौमिक आज दुपारी हॉस्पिटलमध्ये मृत्यू पावले. दुर्घटनेनंतर ते शुद्धीवर आले नव्हते. दोन वर्षांपूर्वी त्यांचा विवाह झाला होता. त्यांना एक छोटी मुलगी आहे. आई, वडील आणि तीन भावंडे आहेत. गृहस्थ ख्यातनाम होते. रेडिओवर गाणी म्हणायचे. त्यांच्या दोन रेकॉर्डस्‌ही आहेत.

श्यामने ती गाणीच ऐकली नव्हती. तेव्हा त्यांचे नावही त्याला माहीत असणे शक्य नव्हते.

हाच तो माणूस होता की काय कोण जाणे. श्याम ओळखत नव्हता. त्याने पेपर खाली ठेवला. खिडकीत उभे राहून एक सिगरेट शिलगावली.

आज ऊन तसेच पडले होते. तेवीस डिसेंबरच्या दिवशी होते तसे. तेच रस्त्यावरचे वळण. त्या मोटरसायकलवाल्याने गाडी वळवली.

गौर भौमिक ! गाणे गायचा ! एक छोटी पोरगी आहे. बायको, आई, वडील, भावंडे ! सर्वांच्या गोतावळ्यात होता. श्यामला तो माहीत नव्हता. त्याने फक्त एक मोटरसायकलवाला पाहिला. त्याचे अनोळखी शरीर. गौर भौमिकबद्दल श्यामला कुठे काय माहीत होते ?

हाच तो होता की काय ? कुणास ठाऊक ? तोच हा माणूस असेल तर आपण ह्या जन्मापुरते तरी सुटलो ! कधीतरी खेळ करता करता आरशाचा झोत टाकला म्हणून कोण आपल्याला जबाबदार धरणार आहे ? कोणालाच कारण समजले नाही. माणूस मेलाय एवढेच समजले.

बरेच दिवस श्यामने आरशात पाहिले नव्हते. आरशावर खूप धूळ जमली होती. स्वत:च्या प्रतिबिंबावर त्याचा विश्वास बसेना. "हा मी ? छे, मान हालवून तो

आपल्या प्रतिबिंबाला म्हणाला, "तू, तू केलंस हे. तू कोण आहेस ? मी ओळखत नाही तुला !"

श्यामने अंगावर शाल टाकली. त्याच एका बाजूच्या हॉटेलात येऊन बसला. एक कप चहा समोर घेऊन सिगरेट ओढीत तो खूप वेळ बसून राहिला. नंतर आठवण झाल्याप्रमाणे पोऱ्याला हाक मारून म्हणाला, "आणखी एक कप चहा आण."

पोऱ्याने चहा आणला. आपल्या चहाच्या कपासमोर त्याने तो चहाचा कप ठेवला. कपाशेजारी किटली ठेवली. त्यावर एक सिगारेट ठेवण्याचा प्रयत्न करू लागला.

हॉटेलचा पोऱ्या डोळे विस्फारून त्याच्याकडे पहात राहिला. दुकानचा म्हातारा मालक त्याच्यावर नजर ठेवून होता. दोन पोरे गप्पा थांबवून त्याच्याकडेच पहात राहिली. श्यामने त्यांच्याकडे लक्ष दिले नाही.

समोरच्या कपावर सिगरेट तशीच जळत होती. वाफ जाऊन चहा थंड झाला होता. नम्र होऊन तो म्हणाला, "गौर भौमिक, शक्य असेल तर परत जन्म घे. मला कल्पना आहे, फिरून जन्म घेणे सोपी गोष्ट नाही.

मी पाण्यातून, मातीतून आयुष्य वाचवले. मग ही चूक का ? केवळ चुकवण्यासाठीच आयुष्य जगतोय ? म्हणून असं वाटतंय, तू परत ह्या पृथ्वीवर जन्म घ्यावास. गौर भौमिक, शक्य असेल तर परत जन्माला ये. तोपर्यंत मी पृथ्वीला सुंदर करीन. तू निर्धोकपणे जाऊ शकशील. रस्त्यावरच्या वळणावरून वेगाने जाशील. लीलाच्या कुशीत जन्माला ये. मी तुला वाढवीन."

तो उठला. दोन कप चहाचे पैसे देऊन बाहेर पडला.

"तू मुलगा होतास, पती होतास, बाप होतास. आणि आता ? आता फक्त एका मोटरसायकलच्या ॲक्सिडंटमध्ये छिन्नविच्छिन्न झालेला एक देह ! तू पृथ्वीवर कोणी नाहीस. गौर भौमिक, माझ्या बॉसने शिवी दिली नसती तर मी नोकरी सोडली असती ? नोकरी सोडली नसती तर खेळण्याच्या निमित्तानं तुझ्या चेहऱ्यावर आरशातून किरण कशाला टाकले असते ? बघ, ह्या सगळ्या एका अज्ञात सूत्रानं बांधलेल्या गोष्टी आहेत. तू कुणाला जबाबदार धरणार ? दोन्ही हात वर उचलून मी सांगतोय, "मी जबाबदार आहे. परत पहा, मस्तक उंचावून मी स्वीकार करतोय. मी दोषी आहे. माझ्यावर जबाबदारी आहे. मध्यरात्री उठून मी हाका मारतो, "श्याम," मीच उत्तर देतो, "आलो."

माझ्या सगळ्या जाणिवा अजून नाहीशा झाल्या नाहीत. आत आत कुठेतरी एक श्याम राहतोय. अनोळखी. पृथ्वी अजून लावण्यवती नाही. मी वाट पहातोय. जन्म घे. फिरून जन्म घे. माझ्याकडे ये.

कुठल्या कुठल्या वेगवेगळ्या रस्त्यांवरून श्याम फिरत होता. डोक्यात, छातीत, सारखा आवाज होत होता. भुंग्यांची गुणगूण ? मोटरसायकलची घरघर ? मधूनच दचकत होता. "तूच, तूच मोटरसायकलवरून उडून विच्छिन्न झालेला माणूस. तू पृथ्वीवरचा कुणी नाहीस."

नाही तर नाही. श्यामला एवढं माहीत होतं की तो श्याम चक्रवर्ती विक्रमपूरच्या बानिखेडा गावचा. 'सेन्ट ॲण्ड मिलर'मधला छोटा साहेब. ह्या सगळ्यांमध्ये मोठा अडथळा आलाय.

आता त्याला माहीत नाही, तो कोण आहे. आपण कोण आहोत ?

## ( १४ )

घसा सुकला. डोके दुखायला लागले. तहान लागली. त्याला ताप येत होता. आंघोळ करतानाच अंगातून शिरशिरी आली होती. तेव्हाच त्याला अंग गरम वाटायला लागले होते. अंगावर मळाची पुटे चढली होती. टॉवेल घासून त्याने अंगावरचा मळ काढायचा प्रयत्न केला. खूप पाणी अंगावर घेतले. अंगाला तेल नव्हते. थंडीने अंग फुटले होते. कान ठणकायला लागले. डोके ठणकायला लागले. दातातून कळा येत होत्या. तरीसुद्धा, त्याने खूप वेळपर्यंत आंघोळ केली. मळकी शाल अंगावर टाकून तो हॉटेलमध्ये गेला. त्याचे अंग कसकसत होते. डोळे जळजळायला लागले होते.

भाताचा पहिला घास घेताच त्याला वाटले, आपल्याला उलटी होणार, तो थोडा वेळ तसाच तोंड धरून बसून राहिला. तोंडाला चुळा सुटल्या. ओठातून लाळ गळायला लागली. रुमाल तोंडावर धरून तो उठला. मरगळलेल्या स्वरात मॅनेजरला म्हणाला, "जेवण कुत्र्यांना देऊन टाका."

" काय झालं ?"

" बरं वाटत नाही."

तो पानाच्या दुकानाशी थांबला. लिंबाचा रस घालून त्याने सोडा घेतला. डोकेदुखीवरच्या दोन गोळ्या घेतल्या. तोंडाला चव नव्हती. त्याला ताप चढला होता.

कित्येक दिवसांपासून त्याने स्वतःकडे लक्षच दिले नव्हते. जोराचा आजार यायची चिन्हे दिसत होती, रोगाशी सामना करायची शरीरातली ताकद दुबळी झाली होती. ह्या वेळी कदाचित् खूप दिवस बिछान्यावर पडून राहावे लागेल. घरीच नाहीतर हॉस्पिटलमध्ये !

श्याम हळूहळू चालत होता. मनात आले, आजारी पडलो तर ? आजारी पडायच्या आधी कोणते काम संपवायचे राह्यले आहे ? अंग थरथरत होते. काम लवकर उरकून टाकण्याची त्याला घाई झाली होती. उन्हात कपडे, धान्य सुकत घालावे आणि पावसाची चिन्हे दिसावी. मग ते घरात आणण्यासाठी जशी धांदल उडावी तशी ! नाहीतर ट्रेन सुटायची घंटा झालेली असावी. वेळ नसावा आणि पोचवायला आलेल्या माणसाला कितीतरी गोष्टी सांगायच्या राहून गेलेल्या असाव्यात. " माझ्या घराकडे लक्ष दे. माझ्या पाळलेल्या पक्ष्याला दाणे घाल. पाणी दे. चोरीबिरी होईल लक्ष ठेव. बागेवर लक्ष ठेव. नाहीतर बागेत गुरे शिरतील, बकऱ्या शिरतील. मी स्वतः लावलेल्या फुलझाडांवर पावसाची मोठी झड येणार नाही ना, ह्याची काळजी घे."

सगळ्या निरर्थक गोष्टी पुटपुटत तो चालला होता. त्याला नीट समजत नव्हते. पण वाटत होते, अशासारखीच जरुरीची गोष्ट आपल्याला कोणाला तरी सांगायचीय. कोणाला ? त्याला कळेना. त्याच्या चारी दिशांना माणसेच माणसे होती, पण त्याच्या दृष्टीने ती शून्य होती. सगळी अनोळखी. अपरिचित. ह्यांच्यापैकी कुणाला सांगायचे ? " नको."

शेतातल्या पिकासारखी उन्हे दुपारी पिवळी झाली, तो आपल्या नेहमीच्या जागेवर येऊन उभा राहिला. त्याला धाप लागली होती. त्याने काचेच्या दाराकडे पाहिले. काच गढुळ झाली होती. आतले जवळजवळ काहीच दिसत नव्हते. श्याम निराश झाला. मनाशी म्हणाला, " फार टंगळमंगळ करतात हे लोक कामात. काच रोज धुवायला हवी." त्याला वाटले, आत जाऊन ऑफिसरला सांगावे, " तुमची काच घाणेरडी झालीय. ती स्वच्छ करायला हवी."

पण तो जागचा हालला नाही. जीव एकवटून ती अस्वच्छ काच भेदून आत पाहण्याचा प्रयत्न करू लागला. भोवती लोक होते. सावलीसारखे. असत्य माणसे, नेमकी त्याचा पत्ता काढून रस्ता, घाट, घर ओलांडून ही मायावी हरिणे येतात तरी कशी ? त्यांच्या खुरांचे आवाज होतात. आणि आत आत मेघांचा गडगडाट होतो. पाऊस पडतो. त्या पावसासारखेच प्रेम त्याच्या अंत:करणात भरून जाते. खूप दूरवरून अनोखळी प्रदेशातून धाड्धाड् करून एक आगगाडी जाते.

श्यामला स्पष्ट दिसले नाही. गर्दीत एक उभट चेहऱ्याचा माणूस त्याच्यासमोर उभा होता. त्याचा चेहरा खूप कठोर दिसत होता. खूप निर्दय. श्याम दचकला, " मिनू ?"

तो श्यामकडे स्थिर नजरेने पाहात होता. त्याचे ओठ हालत होते. तो काहीतरी बोलत होता. त्याला नीटसे कळले नाही. त्याला वाटले, मिनू आपल्याला विचारतोय्, " तू कोण ? तुला काय हवंय ?"

" मी. . . . ." श्याम जीव एकवटून म्हणाला, " मिनू, मी श्याम. श्याम चक्रवर्ती. बानिखाडा गावचा. कमलाक्ष चक्रवर्ती माझे बाबा. आणि तू मिनू ? नारायणगंजचा होय ना ?"

काचेच्या दारापुढे तो उभा होता. त्याचा चेहरा पसरट दिसत होता. त्याचे ओठ हालले. श्यामने ओळखले, तो काहीतरी बोलतोय. म्हणतोय, तुला ओळखलं नाही. दुसऱ्याच क्षणी त्याचा हात वर गेला. श्यामला तो लोखंडाच्या पंजासारखा वाटला. त्याचा तो पंजा सणकन् विजेसारखा खाली आला. असहाय्य श्यामने तो अडवण्याचा प्रयत्न केला नाही. कुठे वार झाला त्याला समजले नाही. त्याला एवढेच समजले, आपले सारे शरीर फूटपाथवर आडवे पडले आहे. त्याने उठायचा प्रयत्न केला. पण जमिनीत पाय रोवून तो समोरच उभा होता. श्यामच्या पोटात बुटाची एक लाथ बसली. त्याला भडभडून उलटी झाली. सगळी छाती भिजून गेली. त्याला हलके, हलके वाटायला लागले. खूप दिवसांपासून हीच उलटी त्याच्या शरीरात दबा धरून बसली होती. श्यामने परत उठायचा प्रयत्न केला. त्याला जमेना. श्यामच्या गळ्याजवळची शाल त्याने मुठीत पकडली होती. ती खेचून त्याने श्यामला उभे केले. त्याचा हात पुन्हा एकदा वर गेला. तोच लोखंडी पंजा श्यामच्या गालावर सणकन् येऊन पडला. श्याम बसला. श्यामने त्याला अडवले नाही.

माराच्या तडाख्याने त्याचे डोके तिरमिरले. सगळे जग त्याच्या भोवती फिरले. श्यामला फार बरे वाटले.

चक्कर येऊन पडता पडता श्याम त्याच्या हाताशी अडखळला. म्हणाला, " का मारतोस मिनू ? का मारतोस ? मी लीलाच्या समोर उभा राहतो म्हणून ? की खूप दिवसांपूर्वी एका माणसावर मी किरणांचे झोत टाकले म्हणून ? नक्की हेच कारण असणार. थांबू नकोस मिनू. थांबू नकोस. शाबास !"

"सुव्वरके बच्चे, साले," मिनू ओरडला.

" नाही. मी श्याम चक्रवर्ती, कमलाक्ष चक्रवर्ती माझे बाबा. विक्रमपूरचा बानिखाडा आमचा गाव !"

श्यामला दिसत होते एक तळे ! घाटावर जायचा रस्ता, झुडूप, सीताफळाच्या बागेत लुकलुक करणारा काजवा ! आणि अवाढव्य, विस्तारलेल्या त्या अंधारात केवळ एक कंदील. आई कंदील घेऊन बसलीय. मृदू स्वरात हाक मारतेय, " मनू, मनू रे मनू. "

चारी दिशांनून माणसे येत होती. उभट काळ्या चेहऱ्याचा मिनू त्याला धमकावत होता. श्यामला काही कळत नव्हते. तरीसुद्धा तो बोलण्याचा प्रयत्न करीत होता. " ठीक आहे. सर्व ठीक आहे. "

मिनू कोणाशी काही बोलला नाही. कोणाच्या प्रश्नाला उत्तर देत बसला नाही. शेवटचे एकदा श्यामकडे पाहून तो निघून गेला.

मिनूच्या पकडीतून सुटलेले त्याचे शरीर मातीत कोसळत होते. आपल्याला. मिनूने का मारले, ते श्यामला समजेना. कारण जाणून घ्यायची त्याला गरज वाटेना. ताप फणफणून भरला होता. दुःख, वेदना त्याला काहीच जाणवत नव्हते. त्याला फक्त झोपावेसे वाटत होते. अनोळखी, अपरिचित माणसांचे कोंडाळे त्याच्याभोवती जमले होते. तो पुटपुटत होता. " दूर व्हा, काचेच्या दारापुढे कोणी येऊ नका. "

आणि आश्चर्य, गर्दीतूनही काचेचे दार त्याला स्पष्ट दिसले. लीला सावलीसारखी काचेशी उभी होती. श्यामने ओळखले. आज लीला त्याची वाट पहात होती. श्यामचा आवडता रंग बसंती. लीला त्याच रंगाची साडी नेसली होती. शांत, खिन्न दिसत होती तिची नजर ! सगळे शरीर नम्रतेने झुकले होते. आई व्हायच्या आधी स्त्रीचे शरीर असावे तसे !

लीलाला रडू येत होते. तिचे ओठ थरथरत होते, " का, इतकी निष्ठुर का झालीस तू ? तो माणूस माझा शत्रू नव्हता. "

एकाएकी श्यामच्या छातीत मेघ गरजायला लागले. हरणे दौडायला लागली. नंतर फक्त हरणे आणि हरणेच ! निष्पाप, सुंदर डोळ्यांची हरणे. त्यांचे कळप उधळत होते. मेघांनी दुपार दाटून आली होती. अपरिचित रेल्वेच्या पुलावरून गाडी धडधडत चालली होती आणि त्याची छाती वृष्टीने भरून आली होती.

धूसर नजरेने त्या गर्दीत श्याम ओळखीचे चेहरे शोधीत होता. " ओ, सोनाकाका. मानुमामा, मी मनू, मी तुमचा मनू. जन्म मिळणं फार कठीण असतं. तरीसुद्धा तुमच्यासाठी मला जन्माला यायचंय. परत एकदा जन्म घ्यायचाय. मुलासाठी किती खस्ता खाव्या लागतात ते माझ्या आईलाच माहीत ! तिचे कष्ट मी हृदयाशी धरून चाललोय. लवकरच मी पृथ्वीवर चांगले दिवस आणीन. "

अत्यंत आवेगाने प्रेमाने तो धरणीच्या कुशीत शिरला.

